हिंदुहृदयसम्राट

## स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर



यांचे आम्ही प्रकाशित केलेले ग्रंथ

- ★ १८५७ चे स्वातंत्र्यसमर
- ★ सहा सोनेरी पाने
- ★ काळे पाणी
- ★ जोसेफ मॅझिनी
- ★ जातीभेद
- ★ हिंदुराष्ट्रदर्शन
- ★ हिंदुपदपातशाही
- ★ हिंदुत्व
- ★ क्रांतीघोष
- ★ मोपल्यांचे बंड
- ★ अग्निनृत्य

मनोरमा प्रकाशन
१०२/सी, माधववाडी, खोली नं.११, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर (मध्य रेल्वे) स्टेशनसमोर, दादर, मुंबई - ४०० ०१४. दूरध्वनी : २४१४८२९९

इन्दु पासून ॥ हिन्दू ॥ ★ ग.वा. कवीश्वर ★ मनोरमा प्रकाशन

# इन्दु पासून ॥ हिन्दू ॥



ग.वा.कवीश्वर

# इन्दूपासून हिन्दू

प्रा. ग. वा. कवीश्वर
'गीतातत्त्वदर्शन'
या पुस्तकाचे लेखक

मनोरमा
प्रकाशन

प्रकाशक :
अनिल रघुनाथ फडके
मनोरमा प्रकाशन
१०२/सी, माधववाडी, खोली नं. ११,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर ( मध्य रेल्वे ) स्टेशनसमोर,
दादर, मुंबई - ४०० ०१४

※



※

संशोधित द्वितीयावृत्ती : जुलै २००६

※

मुखपृष्ठ : अरविंद पाटील

※

संगणकीय अक्षरजुळणी :
एस. एस. आचार्य
विलेपार्ले ( पूर्व )

※

मुद्रक :
सौ. शामला अनंत चिंचणीकर
माधुरी मुद्रण
४४३, शिवाजीनगर,
पुणे - ४११ ००५

※

मूल्य : १०० रुपये.

# प्रस्तावना

आमच्या 'हिन्दू' संबोधनाविषयी बहुप्रचलित धारणा अशी आहे की, (आक्रमक) इस्लामपूर्व ईराण्यांनी पश्चिम भारतातील 'सिंधू' नदीचा 'हिंदू' उच्चार करून, ते नांव भारतीयांसाठी प्रयुक्त केले. आणि ते स्वतः भारतात देशासाठी (व धर्मासाठीही) रूढ होऊन गेले.

या अत्यंत अपमानास्पद धारणेचे या पुस्तकांत समूळ खंडन केले असून, साधार प्रतिपादन केले आहे की, भारतीयांचे हे अतिरिक्त 'हिन्दू' संबोधन भारतातच 'इंदू' या संस्कृत शब्दाचा झालेला प्राकृत उच्चार असून, हे स्वतः भारतीयांनीच स्वाभिमानाने धारण केलेले आहे. हे प्रतिपादन प्रथमदर्शनी सुलभ सुसंगत प्रतीत व्हावे म्हणून यांतील काही मुद्यांचा येथे प्रस्तावनेत संक्षेपाने उल्लेख करतो.

प्राचीन ईराणी अवेस्ता भाषेत काही संस्कृत शब्द 'स' चा 'ह' उच्चार करून समाविष्ट केले गेले; आणि तदनुसार संस्कृत 'सिंधू' शब्द अवेस्ता भाषेत 'हेंदू', 'हिंदू' झाला. पण त्यांनी तो 'एक नदी' या सामान्य अर्थाने वापरला. ईराण्यांनी तो शब्द केवळ त्यांच्याच देशांतील नद्यांसाठी वापरला हे ध्यानात घेऊन प्राचीन ईराणी लेखांवर विचार करणे आवश्यक आहे.

उलट, इकडे भारतात प्राचीन आर्यांनी 'इन्दु' हे एक अतिरिक्त संबोधन स्वतः धारण केले. त्याचा अर्थ नक्षत्रपति चन्द्र असा असून त्याने देशाची सर्वश्रेष्ठता सूचित होते. त्या शब्दाचे जनतेत 'हिन्दू' हे प्राकृत रूपांतर प्रचलित झाले. त्याचा पश्चिम भारतातील विशिष्ट सिंधू नदीशी कांही खास संबंध नव्हता.

आणखी एक महत्त्वपूर्ण बाब अशी की, प्राचीन ईराण्यांनी संस्कृत 'सिंधू'पासून तयार केलेला 'हिन्दू'शब्द त्यांच्या आपल्या बोलीत भारतीयांसाठी वापरला असेही क्षणभर वादासाठी मानले, तरी विदेशियांनी दिलेले ते अतिरिक्त संबोधन स्वतःला लावून घेण्यासाठी विशाल, सुसंस्कृत, स्वतंत्र, स्वाभिमानी भारतीय समाजाला प्रवृत्त करण्याइतकी सांस्कृतिक महानता, अथवा राजकीय प्रभुता, ईराण्यांना केव्हाही नव्हती.

मकरसंक्रांत — ~ ग. वा. कवीश्वर
१४ जानेवारी २००४

## या लेखकाची अन्य साहित्य सेवा

### The Metaphysics of Berkeley

"An achievement of unusual merit...He has a sound faculty of philosophical discrimination... his nicely balanced criticism and appreciation of Berkeley... outstanding philosophical merits of Mr. Kaveeshwar's work"- London Times. "...admirable exposition...I respect the achievement." - 'Philosophy' journal, London. "Scholarly study of Berkeley's metaphysics" - British philosopher C.E.M. Joad.

### Law of karma

Published by the Pune University. Spanish translation published in Barcelona, Spain.

### नीति आणि कलोपासना

**(संशोधित द्वितीय आवृत्ति)**

"दोनही बाजूंचा परागर्ष घेऊन स्पष्ट व समतोल निर्णय"- 'केसरी' पुणे. "फारच उत्तम" - पंडित सातवळेकर. "अत्यंत प्रशंसनीय...मार्मिक उहापोह... फार सुन्दर"-,'ध्रुव' मासिक पुणे. "समतोलपणा... शास्त्रशुद्ध पद्धति... साहित्यांतील एक महत्त्वाचा ग्रन्थ" - 'पुरुषार्थ'. "उत्कृष्ट मार्मिक विवेचन... निर्विवाद सिद्ध... भूमिका आग्रहरहित व प्रतिपादन विद्वत्तापूर्ण"- 'महाराष्ट्र,' नागपूर. "कलेचा नीतीशी अत्यन्त जवळचा संबंध आहे असे प्रतिपादन करणारे हे मराठी साहित्यांतले पहिलेच पुस्तक... निःपक्षपाती... युक्तिवाद व तर्कपद्धति विचारवन्तांना पटणारी, भाषा शुद्ध व विषयास अनुरूप..." - 'महाराष्ट्र शारदा'. हे पुस्तक मुंबई, पुणे, बडोदा, कर्नाटक, नागपुर, आदि विद्यापीठांनी उच्च अध्ययनार्थ नियुक्त केले होते. या पुस्तकाची चर्चा करणारे पुस्तक प्रकाशित झाले आहे.

### गीतातत्त्वदर्शन

श्री शंकराचार्य, रामानुजाचार्य, ज्ञानेश्वर, टिळक, गांधी, विनोबा, अरविंद, राधाकृष्णन् आदींच्या विचारांचा चिकित्सक परामर्श; "पाश्चिमात्य विचारप्रणालीशी तुलना, अर्जुनाच्या मूळ भुमिकेविषयी प्रसृत अनेक अपसमजुतीचे विस्तृत निरसन, यांसह श्रीमद्भगवद्गीता प्रणीत नीतिशास्त्राचे सांगोपांग विस्तृत विवेचन.

### गीतातत्त्वमीमांसा (हिंदी)

### Ethics of the Gita

With foreword by Dr. S. Radhakrishnan; recognised as "Learned Research Work" by the University Grants Commission, New Delhi,



and Vikram University, Ujjain.

### पावित्र्यविडंबनाचा वाद

"ज्या श्रेष्ठ दर्जाच्या असतात व ज्यांच्या मूलगामी अन्वेषणाने विचारांस नीट वळण लागू शकते अशा कृतींपैकी प्रा. कवीश्वर यांचे प्रस्तुत पुस्तक आहे" - **'महाराष्ट्र नागपुर'.** "भुमिका शास्त्रशुद्ध व तत्त्वविवेचकाची... विडंबनाची त्यांनी केलेली व्याख्या सर्वसंमत होण्यासारखी आहे... विवेचन अत्यन्त मार्मिक... मोठे अभ्यासपूर्ण... अत्यन्त संयमपूर्वक व शक्य तो मूलगामी पद्धति..." **- 'मनोहर' मासिक**

### ज्ञानेश्वरी विरुद्ध गीता

मूळ गीता व ज्ञानेश्वरी यांची सादर पण चिकित्सक तुलना. संशोधित द्वितीय आवृत्ती.

### महाभारताची गूढ रहस्ये

(संशोधित वर्धित द्वितीय आवृत्ती)

### महाभारत के गूढ रहस्य (हिंदी)

(संशोधित वर्धित द्वितीय संस्करण)

### CHRONOLOGICAL SECRETS OF THE MAHABHARATA WAR

"Most revealing and important for future research"

***- Dr. Stella Kramrisch, Professor New York University***

- "नया प्रकाश डाला है वह सर्वथा उपादेय है।"

***- डॉ. सम्पूर्णानंद, भूतपूर्व मुख्य मन्त्री, उत्तर प्रदेश***

"This one man probe... The discovery which is his own... Events which drove many of our learned scholars into a blind lane and which baffled all attempts so far have been explained by him and linked up into a congent story".

***- Nagpur Times.***

" - The Secrets of Mahabharata, a literary Discovery"

***Prof. Awadhoot Shastri. article in 'Bharata Jyoti', Bombay***

"आपके वैदुष्यपूर्ण व्याख्यानों से (दिल्ली का) श्री लालबहादूर शास्त्री राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठ गौरवान्वित हुआ है। महाभारत युद्ध सम्बन्धी गवेषणानिरत विद्वानों को पुनः विचार करने की प्रेरणा दी है।"

***- महामहोपाध्याय पं. परमेश्वरानंद शास्त्री, विद्याभास्कर, दिल्ली***

"वस्तुतः आप जानते है महाभारत को"

*- आचार्य मधुसूदन शास्त्री, प्रधानमंत्री, अखिल भारत पंडित महापरिषद, वाराणसी.*

"A significant contribution to world culture".

*- Vikram University, ujjain (Special resolution).*

"Very original"

*- Editorial note in the book "Age of "Bharat War".*

"...G.W. Kaveeshwar has propounded the theory that though the Bharata war was actually fought for 18 days, its duration was of 35 days, every alternate day being the day of rest... has very convincingly explained the whole matter". *- The Study of Indian History and Culture, Vol. I. (Thane, 1988) pages 302-308*

'या नवीन शोधामुळे आता गीताजयन्ती तिथि बदलण्याची वेळ आली आहे.'

*- संपादकीय लेख, 'गोमन्तक', गोवा.*

'प्राचार्य ग. वा. कवीश्वर यांनी महाभारत ग्रंथातील युद्धविषयक वचनांचा सूक्ष्म अभ्यास करून ती सर्व सुसंगत आहेत, त्यायोगे युद्धाच्या सर्व तिथ्या, बलरामाच्या तीर्थयात्रेचे दिवस, भीष्मांचे निधन इत्यादिकांचे महाभारतातील उल्लेख कसे बरोबर जमतात हे सविस्तर दाखविले आहे. हे प्रथम सविस्तर दाखविण्याचे श्रेय सर्वस्वी प्रा. कवीश्वरांचे आहे...सध्या प्रचलित असलेल्या काही संस्मरणीय तिथ्या (उदाहरणार्थ गीता जयन्ती तिथी, भीष्म निधन तिथी) बदलाव्या लागतील'

*- डॉ. वा. वि. मिराशी, नागपूर.*

"महाभारत युद्धतिथ्यांवर सर्वोत्तम प्रकाश."

*-'तरुण भारत, नागपूर'*

"प्रा. ग. वा. कवीश्वर यांनी तिथ्यांसंबंधीच्या सर्व श्लोकांचा सखोल अभ्यास करून महाभारतातील आजवर गूढ वाटणाऱ्या सर्व तिथ्यांची साधार सुसंगती लावण्याचे आश्चर्यजनक कार्य करून तिथ्यांबद्दलच्या सर्व शंकांचे समाधानकारक निरसन केले आहे. या मौलिक संशोधनाबद्दल महाभारताचे चिकित्सक अभ्यासक खचितच त्यांचे ऋणी राहतील"

*- 'धर्मभास्कर', मासिक, मुंबई*

"महाभारत की रचना के बाद ऐसा महान कार्य कोई भी व्यक्ति या संस्थासे संभव नही हुआ. महाभारतसंबंधी कूटरहस्यभेदन के लिए परमात्माने आपको चुना. आपकी इस सफलता के लिए आपको अनेकशः बधाई -" *मुरलीधर हरिहरनो, अध्यक्ष प्राच्यविद्याशोधमंडल, रायपुर; अध्यक्ष भारतीय ज्योतिष परिषद, राजनंदगाव.*

"व्यासो वेत्ति शुको वेत्ति वेत्ति वायं कवीश्वरः। रहस्यं व्यासकूटानां तुरियो वेत्ति वा न वा।।"

**- पंडित उपेन्द्रनाथ राय, शास्त्री, मेटेली (जलपैगुडी), पश्चिम बंगाल.**



# अनुक्रमाणिका

**प्रा. ग. वा. कवीश्वर**

B-38 M.I.G.,इंदिरा कॉलनी, बऱ्हाणपुर (मध्यप्रदेश) ४५०३३१

**जन्म** - मध्यप्रदेशात मंडलेश्वर गांवी. ९-२-१९१२

**शिक्षण** - इंदोरला. M.A. Philosophy (First class); L.L.B. (First class first)

**सेवा** - पाच वर्षे न्यायाधीश, शेष वर्षे दर्शनशास्त्र प्राध्यापक व महाविद्यालय प्राचार्य (सन १९७२ मधे सेवानिवृत्त)

**ग्रंथरचना** - 'The Metaphysics of Berkeley' (London Times द्वारा प्रशंसित) (२) 'नीति आणि कलोपासना' (अनेक विश्वविद्यालयात पाठ्यपुस्तक) (३) 'पावित्र्यविडंबनाचा वाद' (सयाजी साहित्य माला, बडोदे, द्वारा प्रकाशित) (४) 'वर्तमानकाळ', पत्रात्मक कादंबरी (अजमेर बोर्डाने परीक्षेसाठी नियुक्त) (५)'फुलांची भेट' (लघुलेखसंग्रह) (६) 'गीतातत्त्वदर्शन' (७) 'गीतातत्त्वमीमांसा' (हिंदी) (८) 'Ethics of the Gita' (भारतीय 'विश्वविद्यालय अनुदान आयोग, नवी दिल्ली, द्वारा 'Learned Research Work' अशी मान्यता व प्रकाशनास आर्थिक साह्य (९) 'ज्ञानेश्वरी विरुद्ध गीता' (१०) 'महाभारताची गूढ रहस्ये' (११) 'महाभारत के गूढ रहस्य' (हिंदी) (१२) 'Chronological secrets of the Mahabharata War' (१३) 'इंदुपासून हिंदू' (१४) 'इंदु से हिंदू' (हिंदी) (१५) 'The Law of Karma' (याची स्पॅनिश आवृत्ती प्रकाशित झाली आहे); (१६) 'Problems of Child Education in India' (edited), (अनेक नियतकालिकांत स्फुट लेखन)

**मानसन्मान** - मध्यप्रदेश तत्त्वज्ञान परिषदेतर्फे सन्मान; मध्यप्रदेश मराठी साहित्य संघ, भोपाळच्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद. इंदोरला अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे कार्यकारी अध्यक्षपद, जागतिक मराठी परिषदेच्या इंदोर शाखेकडून गौरव

'Ethics of the Gita' पुस्तकाला डॉ. राधाकृष्णन द्वारा प्रशंसात्मक Foreword; अमेरिकेतील 'Who's who' व 'Great minds of the 21st century' या दोन प्रकाशनात आणि Cambridge (England) मधे प्रसिद्ध होणाऱ्या '2000 Outstanding Intellactuials of the 21st century' या प्रकाशनात समावेश.



प्रकरण १

# प्रचलित धारणा

**भारताचे 'हिन्दू' नाव 'सिंधू'चा ईराणी उच्चार आहे काय?**

भारत देशाचे 'हिन्दुस्थान' असेही नांव रूढ आहे. हे नाव कसे प्रचारात आले?

याविषयी बहुप्रचलित धारणा अशी आहे की, प्राचीन ईराणी लोकांनी भारतातील रहिवाशांसाठी 'हिंदू' नाव 'सिंधु' शब्दावरून ('स' चा 'ह' आणि 'ध'चा 'द' करून) तयार केले. या धारणेला दोन वैकल्पिक तपशील जोडले जातात. एक असा-प्राचीन ईराण्यांनी पश्चिम भारतातील 'सिंधु' नदीच्या पलीकडे, (म्हणजे तिच्या पूर्वतटावर व त्याच्या आसपास) राहणाऱ्या लोकांना 'हिन्दु' संबोधित केले. दुसरे स्पष्टीकरण असे दिले जाते की, प्राचीन वैदिक आर्यांनी (भारतीयांनी) (ऋग्वेदात) आपल्या निवासाच्या प्रदेशाला 'सप्तसिंधू' (सात नद्यांचा प्रदेश) म्हटले, आणि प्राचीन (इस्लामपूर्व) इराणी लोकांनी त्यांच्या अवेस्ता भाषेत त्याचे 'हप्तहिंदू' करून ते भारतासाठी वापरले, व कालांतराने त्याचा 'हिंदू' असा संक्षेप होऊन ते नाव भारतीयांना दिले गेले, व भारततही रूढ झाले.

ही दोन स्पष्टीकरणे परस्पर पूर्ण सुसंगत नाहीत. जर 'हप्तहिंदू' वैदिक 'सप्तसिंधू'चे रूपांतर असेल, व हिंदू नांव 'हप्तहिंदू'चा संक्षेप असेल, तर भारतीयांसाठी प्रयुक्त 'हिंदू' नांवाचा विशिष्ट सिंधू नदीशी खास संबंध असणार नाही.[1] आणि जर ईराण्यांनी 'हिंदू' शब्द विशिष्ट 'सिंधू' नदीच्या नांवावरून तयार केला असेल, तर त्याचा ऋग्वेदातील 'सप्तसिंधू' प्रदेशाशी विशेष संबंध असणार नाही. पण तरीही या दोन

१ किंबहुना, ऋग्वेदावरील सायन भाष्यांत (पुढे उदधृत) त्या सात नद्यांत विशिष्ट सिंधू नदीचे नाव समाविष्टही नाही.

स्पष्टीकरणांची कशीतरी सरमिसळ करून प्रतिपादन केले जाते की, ईराण्यांनी भारतासाठी तयार केलेले 'हिंदू' नाव विदेशात (Indo, Indica,Inde, India अशा रूपांतरांसह), आणि विशाल भारत देशातही, सर्वप्रचलित होऊन गेले. या धारणेची काही उदाहरणे पाहा.

"भारतीय संस्कृति कोश" (खंड १०) 'हिन्दु समाज' शब्दाच्या स्पष्टीकरणात म्हणतो,

"आर्य लोक ध्रुव प्रदेशातील वस्ती सोडून खाली उतरत उतरत पंजाबात आले. पंजाबातून सात नद्या वाहतात; त्याच्यावरून पंजाबला सप्तसिन्धूचा प्रदेश असे नाव मिळाले. आर्यांनी या प्रदेशात आपली वस्ती मांडली. त्यामुळे त्यांनाही पश्चिमी लोक सप्तसिन्धू म्हणू लागले. पारशांच्या अवेस्तामध्ये त्याचा उल्लेख हप्तहिन्दू असा आहे. सप्तसिन्धूच्या पूर्वेकडील भागांतील लोकांना पश्चिमेकडील लोक हिन्दू म्हणून ओळखू लागले."

चिं. वि. वैद्य लिहितात,'हिन्दुस्थान हे नाव बाहेरच्या लोकांनी दिलेले आहे.' ('महाभारताचा उपसंहार' पृ. ७७). सावरकर 'Essentials of Hindutva' पुस्तकांत म्हणतात, 'हिन्दु' नाव भारतीयांना संबोधित करण्यासाठी ईस्लामपूर्व प्राचीन ईराणनिवासियांनी केलेले 'सिन्धु'चे रूपांतर आहे.

"The Vedic name of our nation सप्तसिन्धु has been mentioned as 'हप्तहिन्दु' in the Avesta by the ancient Persian people. Thus in the very dawn of history we find ourselves belonging to the nation of the सिन्धुस or Hindus (P.5)" The Avesta Persians know us as Hindus, the Greeks dropping the harsh accent as Indos and through the Greeks almost all Europe and later on America as हिन्दु or Indians" (p.90) ["आपल्या राष्ट्राच्या वैदिक नाव 'सप्तसिंधु'चा प्राचीन ईराणी लोकांनी अवेस्ता मध्ये 'हप्तहिंदू' असा उल्लेख केला आहे. अशा प्रकारे ऐतिहासिक युगाच्या उदयकालीच आपण सिन्धू अथवा हिंदू लोकांच्या राष्ट्राचे होतो असे आढळून येते... अवेस्ताभाषी ईराणी आपल्याला 'हिन्दू,'



ग्रीक त्यातील कठोर उच्चार गाळून 'इण्डोस,' आणि ग्रीकांच्याद्वारे जवळजवळ संपूर्ण युरोप व त्यानंतर अमेरिका आपल्यास हिन्दू अथवा इंडियन म्हणत असतात."]

सावरकर हेही म्हणतात की, भारतातील काही प्राकृत भाषांत देखील सिन्धूचे 'हिन्दु' रूपांतर झाले असेल. पण त्यांचा एकंदर भर भारतीयांना ते नाव परकीय इस्लामपूर्व ईराण्यांनी दिले यावर आहे. इतकेच नव्हे, तर सावरकर त्याचे असे स्वागतही करतात-

"But if the world hits upon the word by which they would know us as one redolent of our glory or our early love then that word is certain not only to shadow but to survive every other name we have. This fact... soon enabled the epithet Hindu to assert itself once more and so vigorously as to push into the background even the well beloved name of भरतखंड itself". (P.10) ["परंतु जर दुनिया आम्हाला संबोधित करण्यासाठी, आमची सुकीर्ती अथवा आमची पूर्वीची प्रिय भावना ध्वनित करणारा नेमका शब्द प्रयुक्त करेल, तर तो शब्द अवश्य आमच्या अन्य सर्व नावांना मागे सारील इतकेच नव्हे, तर ती नावे विस्मृत झाली तरी तो शब्द कायम राहील. या तथ्यामुळे.... 'हिंदू' संबोधन लवकरच पुनः एकदा स्वतःला प्रस्थापित करू शकले, आणि ते इतक्या तीव्रतेने की आमचे विशेष प्रिय संबोधन 'भरतखंड' देखील पार्श्वभूमीत ढकलले गेले."]

वाराणसीच्या नागरी प्रचारिणी सभेद्वारा प्रकाशित " हिंदी शब्द सागर" (भाग ११) मध्ये 'हिंद' शब्दाबद्दल पुढील म्हटले आहे-

"यह शब्द वास्तव में 'सिंधु' शब्द का फारसी उच्चारण है। प्राचीन काल में भारतीय आर्यों और पारसीक आर्यों के बीच बहुत कुछ संबंध था...ईसा के ५०० वर्ष पहले दारा (दारयबहु) प्रथम के समय में सिंधु नदी के आसपास के प्रदेश पर पारसियों का अधिकार हो गया था। प्राचीन पारसी भाषा में संस्कृत के 'स' का उच्चारण

'ह' होता था।...इसी नियम के अनुसार 'सिंधु' का उच्चारण प्राचीन पारस देश में 'हिंदु' या 'हिंद' होता था। पारसियों के धर्मग्रंथ 'आवस्ता' में 'हप्तहिंद' का उल्लेख है जो वेदों में भी 'सप्तसिंधु' के नाम से आया है। धीरे धीरे 'हिंद' शब्द सारे देश के लिये प्रयुक्त होने लगा। प्राचीन युनानी जब फारस आए, तब उन्हे इस देश का परिचय हुआ और वे अपने उच्चारण के अनुसार फारसी 'हिंद' को 'इंड' या 'इंडिका' कहने लगे, जिससे आजकल 'इंडिया' शब्द बना है." साहजिकच या ग्रंथात 'हिंदु' शब्दासंबंधात म्हटले आहे की,'' यह प्राचीन पारसियों का दिया हुवा है जो उनके द्वारा संसार में सर्वत्र प्रचलित हुआ।''

शिवदत्त ज्ञानी 'भारतीय संस्कृति' पुस्तकात (प्रकरण ३) म्हणतात-

'हिन्दु शब्द का जन्म सिन्धु शब्द से होता है। आधुनिक पारसियों के पूर्वज, जो कि ईरान देश में बसे थे, भारतीय आर्यों को 'हिंदू' नाम से ही जानते थे। वे स्वतः भी आर्य थे तथा भारतीय भी आर्य थे। इसलिये कदाचित उन्होंने भारतीयों को 'हिंदु' नदी के पारवर्ती आर्य या 'हिंदू आर्य' कहकर हिंदू नाम को उपयुक्त किया होगा। ...प्राचीन ईराननिवासी संस्कृत 'स' के स्थान में 'ह' का उच्चारण करते थे....... इस प्रकार प्राचीन ईरानियों ने सर्वप्रथम हमारे लिए 'हिंदू' शब्द प्रयुक्त किया। उनके धर्मग्रन्थ अवेस्ता (वेन्दिदाद) में इन सब बातों का स्पष्ट उल्लेख है। ...प्राचीन अरब के निवासी भी हमें 'हिंदू' व हमारे देश को 'हिन्द' कहते थे... इसी प्रकार मुसलमानोंने भी भारतीयों को 'हिन्दू' तथा भारतवर्ष को 'हिन्द' अथवा 'हिन्दोस्ताँ' नाम से संबोधित किया.......भारतीय समाज अपनापन खोकर इनसे प्रभावित हुआ व उसने 'हिन्द' 'हिन्दुस्थान' आदि नाम अपना लिये.......'हिन्दू' तथा 'हिन्दुस्थान' नाम मुस्लिम आक्रमणों के पश्चात भारतीय साहित्य तथा बोलचाल में प्रचलित हुये..... ये नाम भारतीयों की मानसिक दासता के सूचक है और यह दासता राजनीतिक दासता से ही उत्पन्न होती



है।..... किन्तु भारतीयों को चाहिये कि अपने प्राचीन नामों को अपनाये...... राष्ट्रीय भावना की जागृति इन्हीं प्राचीन नामों से ही हो सकता है, न कि विदेशियों द्वारा दिये गये 'हिन्दु' आदि नामों से।"

राधाकुमुद मुकर्जी (हिन्दी आवृत्ती 'हिन्दु सभ्यता', पृ. ५९) म्हणतात- 'पुराने समय में विदेशी लोग भारत को उसके उत्तर-पश्चिम में बहनेवाले महानद सिन्धु के नाम से पुकारते थे, जिसे ईरानियों ने हिन्दु और यूनानियों ने हकार लोप करके 'इण्डोस' कहा".

अशाच दृष्टिकोनाने वेद मेहता लिहितात-

"The word 'Hindu' was first used by Persians who invaded northwestern India in the sixth century B.C., and they applied it to the Sanskrit speaking people they found living by the Indus river, which in Sanskrit is called the Sindhu and which the Persians called the Hindu". ('A Portrait of India', New York, 1970), ("हिन्दू शब्दाचा प्रथम प्रयोग उत्तर पश्चिम इंडियावर ई. पूर्व सहाव्या शतकात आक्रमण करणाऱ्या ईराण्यांनी केला, आणि त्यांनी तो संस्कृतात जिला सिंधू म्हणतात व ईराण्यांनी हिंदू म्हटले त्या इंडस नदीच्या आसपास राहणारे जे संस्कृतभाषी लोक त्यांना आढळले त्यांना लावला.")

जवाहरलाल नेहरू देखील 'हिंदू' नावांविषयी म्हणतात-

"But it is clear that the word is a very old one, as it occurs in the Avesta and in the old Persian. It was used then and for a thousand years or more later by the peoples of western and central Asia for India, or rather for the people living on the other side of the Indus river. The word is clearly derived from Sindhu, the old, as well as the present Indian name for the Indus. From the Sindhu came the words Hindu and Hindustan, as well as Indus and India". ('Discovery of India'P.76) [ 'परंतु हे स्पष्ट आहे की, हा शब्द फार पुरातन

आहे, कां की, तो अवेस्तात आणि प्राचीन ईराणी भाषेत प्रयुक्त आहे. तो त्या काळी, आणि नंतर एक हजार वर्षे अथवा त्याहूनही अधिक काळ पश्चिम व मध्य आशियाच्या लोकांनी इंडियासाठी, किंबहुना इंडस नदीच्या पैलतीरावर राहणाऱ्या लोकांसाठी वापरला होता. तो शब्द उघडच सिंधु, जे इण्डसचे पुरातन आणि तसेच वर्तमान इंडियन नांव आहे, पासून तयार झालेला आहे. सिंधु शब्दापासून हिन्दू व हिन्दुस्तान आणि त्याचप्रमाणे इण्डस व इण्डिया शब्द झाले.']

भारतीय लेखकांनीच असे म्हटल्यावर अन्य तसे म्हणतील यांत काय आश्चर्य? World University Encyclopedia या अमेरिकी सन्दर्भग्रंथात Hindustan शब्दाबद्दल म्हटले आहे, "Original Persian name for India." [इंडियासाठी मूळ ईराणी नांव]. H.G. Rawlinson म्हणतात, "Thus 'India' is Greek, 'Hindu' is Persian" ("Intercourse between India and the Western World - from the earliest times to the Fall of Rome" P. २०)["अशा प्रकारे 'इंडिया' ग्रीक (शब्द) आहे, 'हिंदू' ईराणी"]. Oxford English Dictionary (Vol.VII, P.244) मध्ये अशी माहिती दिली आहे,

"Hindu, Hindoo : Pers.hindu; Urdu hindu, Indian, Zend hendu = Skr Sindhu river,spe. the Indus, hence the region of the Indus, Sindh, gradually extended by Persians, Greeks and Arabs, to northern India as a whole". [' हिन्दु, हिन्दू: ईराणी हिंदु, उर्दू हिन्दु, इंडियन, झेंद हेंडू = संस्कृत सिंधु नदी, विशेषतः इंडस नदी, म्हणून इंडस् नदीचा प्रवेश, सिंध, हळूहळू ईराण्यांनी ग्रीकांनी व अरबांनी संपूर्ण उत्तर इंडिया पावेतो विस्तारला.]

भारतासाठी प्रयुक्त 'हिंदु' नावाच्या इराणी उद्भवाविषयी ही बहुप्रचलित धारणा कितपत साधार आहे?

**भारताने अतिरिक्त परकीय नाव स्वीकारले असते काय?**

प्राचीन ईराणियांनी भारतासाठी ('सिन्धु' पासून) 'हिन्दू' नाव तयार



केले असते, तरी ते नांव स्वतः समग्र भारतातही-पूर्ण स्वातंत्र्याच्या त्या काळात--सर्वमान्य व रूढ झाले असते काय? ज्या वेळेस ईराण्यांनी भारतीयांना 'हिन्दु' नाव दिल्याचे म्हटले जाते, त्या काळी येथे वेदांसमान अक्षर साहित्य निर्माण झालेले होते, मोठमोठी स्वतंत्र राज्ये होती, या देशाला आर्यावर्त, भरतखंड, भारतवर्ष अशी स्वतःची नावे होती, संस्कृत भाषा सुप्रतिष्ठित होती, जागोजाग विद्याध्ययनाची केन्द्रे होती, आणि अनेक विदेशांशी दळणवळण चालू होते. अशा देशाला कोणा परकीयांकडून आणखी एका नांवाची काय आवश्यकता होती?

परकीयांनी दिलेले नाव भारतीयांनी आपल्यासाठी स्वीकारले नसते असे सावरकरही म्हणतात. (पूर्व उल्लेखित P.46). पण त्यांचा विरोध मुख्यत्वे इस्लामी आक्रमकांवर केन्द्रित असून, इस्लामपूर्व ईराणी लोकांनी या देशाला 'हिन्दू' नाव दिले असेल या धारणेचे ते खंडन करीत नाहीत; उलट वर उद्धृत केल्याप्रमाणे, ते त्याचे काहीसे कौतुकच करतात.

**प्राचीन भारताचाच अन्यांवर सांस्कृतिक प्रभाव**

याच प्राचीन काळात स्वतः भारतीय आसपासच्या देशांना ब्रह्मदेश, श्याम (सयाम), यवद्वीप (जावा), सुमात्रा, सिंहपुर (सिंगापूर), गांधार (आधुनिक अफगाणिस्तान), गंधमादन, अशी नावे देत होते. त्यांनी इतर कोणी दिलेले नाव स्वतःला काय म्हणून लावून घेतले असते?

G. Coedes ("The Indianized States of Southern Asia", English Translation ;by Susan Brown Cowing, Introduction,pp. xv, xvi) दक्षिणपूर्व आशियाच्या त्या देशांना Farther India ('बृहत्तर भारत') असे कथित करून स्पष्ट करतात.

"Culturally speaking, Farther India today is characterised by more or less traces of the Indianization that occurred long ago : the importance of the Sanskrit element in the vocabulary of the languages spoken there; the Indian origin of the alphabets with which those languages have been or still are written; the influence of Indian law and administrative organization;... and the presence

of ancient monuments which, in architecture and sculpture, are associated with the arts of India and bear inscriptions in Sanskrit".

["सांस्कृतिक दृष्टीने पाहता 'बृहत्तर भारत' फार पूर्वकाळी झालेल्या भारतीयकरणाच्या कमी अधिक चिन्हांनी आज अंकित आहे. तेथे बोलल्या जाणाऱ्या भाषांच्या शब्दावलीत संस्कृत अंशाचा प्रभाव; ज्या वर्णाक्षरांत त्या भाषा लिहिल्या गेल्या आहेत आणि अद्यापही लिहिल्या जात आहेत त्यांचा भारतीय उगम; भारतीय कायदा व शासकीय व्यवस्था यांचा प्रभाव.... आणि ज्या स्थापत्य व शिल्प क्षेत्रात भारतीय कलांशी संबद्ध असून ज्यांच्यावर संस्कृतमध्ये लेख अंकित आहेत, अशा प्राचीन स्मारककृतींचे अस्तित्व."]

Codes पुढे आणखी Sylvain Levi[१] यांचे हे वचनही उद्धृत करतात,

"Mother of wisdom, India gave her mythology to her neighbours who went to teach it to the whole world. Mother of law and philosophy, she gave to three-quarters of Asia a god, a religion, a doctrine, an art. She carried her sacred language, her literature, her institutions into Indonesia, to the limits of the known world". ['ज्ञानजननी भारतभूमीने आपल्या शेजाऱ्यांना आपले पौराणिक ज्ञान दिले, ज्याचा त्यांनी सर्व जगात प्रसार केला. विधिशास्त्र व दर्शनशास्त्राची जननी होऊन भारतभूमीने आशिया खंडाच्या तीन चतुर्थांश भागाला ईश्वरविषयक धारणा, धर्म, सिद्धान्त व कला दिली. भारतवर्ष आपली पावन भाषा, साहित्य, आपल्या संस्था इंडोनेशिया पावेतो तत्कालीन ज्ञात जगाच्या सीमेपावेतो घेऊन गेला.']

या शिवाय coedes त्या देशांवर भारताच्या सभ्यताप्रसाराचे विशेष महत्त्व ("The great importance of the civilizing activity of India on those countries") दर्शवीत लिहितात की, (The citizen

१ L'Inde civilisatrice : Apercu historique, Paris,1938,P.136.



of Combodia) is subject to courts that judge according to a written code; he fervently practises a religion that possesses dogma, sacred writings, and a clergy and at the same time, gives him coherent views of the world and hereafter..... he uses a system of writing that gives him access to a vast literature..... All this he owes to India'. (उक्त, pp. xvi, xvii). (कंबोडिया देशाचा नागरिक) ['अशा न्यायालयांच्या अधीन आहे जी लेखनबद्ध कायद्यानुसार न्याय देतात; तो आस्थापूर्वक अशा धर्माचे पालन करतो ज्यात एक विशिष्ट सिद्धांत, पावन लेख व उपाध्याय असून, याबरोबरच जो इहलोक व परलोकाबद्दल सुसंगत विचार देतो.... तो अशा लेखन पद्धतीचा प्रयोग करतो जी ज्याला व्यापक साहित्यात प्रवेश करून देते..... हे सर्व त्याला भारतापासून प्राप्त झाले आहे.']

याच संदर्भात व्हिएतनाम देशासंबंधी एका लेखांतील हे उद्धरण -

"Danang in Central Vietnam, a busy port city.... houses the Cham Museum, which displays the Hindu-inspired artwork of the ancient people who ruled Southern Vietnam". ('The Vietnam Experience', by Veronica Garbutt, 'Asia Magazine', Hong Kong, May, 15, 1988) [' मध्य व्हिएटनाममध्ये समुद्रतटावर गजबजलेले दानांग शहर आहे... तेथे चॅम वस्तुसंग्रहालय आहे; त्यात दक्षिण व्हिएतनामवर शासन करणाऱ्या प्राचीन लोकांच्या हिन्दूप्रेरित कलाकृती प्रदर्शित आहेत'].

आणि शेवटी प्राचीन भारताच्या आंतर्देशीय सांस्कृतिक प्रभावाचे आणखी एक प्रमाण पाहा,

"Ptolemy's map of the Indo-Chinese coast contains Skr.names, indicating the extstence of Hindu settlements as early as the 1st century A.D. In Cambodia, the remains at Angkor, Nakhom Wat, Borobudur, and other places are of Indian origin in their details". (Encyclopaedia of Religion

and Ethics, edited by James Hastings, Vol.6).

['टॉलेमीकृत इंडोचीन समुद्रकिनाऱ्याच्या नकाशात संस्कृत नावे असून ती कंबोडिया देशात ईसवी प्रथम शतका इतक्या प्राचीन काली हिंदू वसाहतींचे अस्तित्व दर्शवितात. कंबोडियांत अंगकोर, नाखोम वट, बोरूबुदुर व अन्य स्थानांतील स्मारके त्यांच्या तपशिलात भारतीय मूलाची आहेत']

मात्र coedes लिहितात,

"Curiously, India quickly forgot that her culture had spread over such vast domains to the east and southeast. Indian scholars have not been aware of this fact until very recently; it was not until a small group of them, having learnt French and Dutch, studied with the professors of the universities of Paris and Leyden that they discovered, in our works and those of our colleagues in Holland and Java, the history of what they now call, with justifiable pride, 'greater India'". ('आश्चर्य असे की, भारतवर्ष लवकरच विसरून गेला की, त्याची संस्कृती पूर्वेस व दक्षिण पूर्वेस अशा विशाल प्रदेशात प्रसारित झाली होती. भारतीय विद्वानांना अगदी अलीकडे पावेतो याची जाणीव नव्हती; त्यांच्यातील काही थोड्या जणांनी, फ्रेंच व डच भाषा शिकून, पॅरीस व लीडेन विश्वविद्यालयांच्या प्राध्यापकांजवळ अध्यपन केल्यानंतरच, त्यांना आमच्या व हॉलंड आणि जावा येथील आमच्या सहकाऱ्यांच्या पुस्तकांत, ज्याला ते आता उचित स्वाभिमानाने 'बृहत्तर भारत' म्हणतात त्याच्या इतिहासाची माहिती झाली'].

हे पाहता स्वतः भारतीय विद्वान देखील आपल्या पूर्वजांनी धारण केलेले संबोधन 'हिंदू' हे विदेशी ईराण्यांनी दिलेले आहे ही अपमानास्पद कल्पना घोळत राहिले यांत काय आश्चर्य?

**भारतातही 'सिन्धू'चे 'हिंदू' झाले नाही.**



ईराण सोडा, पण खुद्द भारतातच 'सिन्धू'चे 'हिन्दू' रूपांतर प्रचलित झाले काय? भारतीय लोकभाषांतही कधी कधी 'स' चा 'ह' होतो. अथर्ववेदांतील 'हरितो न रंह्णाः' (२०-३०-४) या वचनासंबंधात 'निघंटु' कोशात म्हटले आहे, 'सरितो हरितो भवन्ति सरस्वत्यो हरस्वत्यः' ('सरितः' शब्दाचे 'हरितः' व 'सरस्वत्यः'चे 'हरस्वत्यः' रूपांतर होते). पण असे असले तरी, सिन्धु नदीचे, सिन्धु प्रदेशाचे, नांव तदनुसार बदललेले कोठे आढळते? भारतात ही नावे जशीच्या तशीच कायम आहेत. आणि त्याबरोबरच कित्येक शतकांपासून हिन्दू शब्द व्यापक अर्थाने समग्र भारतवर्षाच्या संदर्भात वापरला जात आहे. उघडच हे दोन शब्द परस्पर स्वतंत्र आहेत.

हे सारे ध्यानात घेता भारतीयांच्या वाणीत, फार काय हृदयात, प्रदीर्घ कालापासून सश्रद्ध दृढमूल होऊन बसलेल्या या 'हिन्दू' शब्दाची अन्य साधार सयुक्तिक व्युत्पत्ति शोधली पाहिजे.



प्रकरण २

# प्राचीन चीनी उल्लेख

## ह्यएन च्वांगचा प्रवासवृत्तांत

भारतासाठी प्रयुक्त 'हिन्दु' नावाच्या व्युत्पत्तीचा काही विश्वसनीय पुरावा प्राचीन चीनी लेखनांत उपलब्ध आहे. बुद्ध धर्माचा भारतात उदय झाल्यावर अनेक बाहेरच्या देशांतही त्याचा प्रसार झाला. यामुळे त्याचे काही विदेशी अनुयायी त्या धर्माच्या पावन उगमस्थानाची यात्रा करण्यास प्रवृत्त झाले. असे एक प्रवासी या देशाला ई.सनाच्या सातव्या शतकाच्या पूर्वार्धात भेट देणारे चीनी विद्वान Yuan Chwang (Hsuan tsang) हे होत.

च्वांग यांनी भारतात बरेच भ्रमण करून अनेक ग्रंथांचे अध्ययन केले. त्यांच्या प्रवासाचा वृत्तांत चीनी भाषेत उपलब्ध असून, त्याचे ज्यूलियन यांनी (Stanislas Julien,"Memories sur les Contrees Occidentales, Traduits Du Sanscrit en Chinois,en L'an 648, Par Hiouen-Thsang") फ्रेंच भाषेत, व बील (S.Beal, "Buddhist Records of the Western World ---- Chinese Accounts of India"). यांनी इंग्रजीत भाषांतर केले आहे. याशिवाय, वॅटर्स (Thomas Watters, "On Yuan Chwang's Travels in India") यांनी मूळ चीनी ग्रंथाचे काही उतारे इंग्रजीत भाषांतरित केले असून, आपल्या स्पष्टीकरणात्मक टीपाही दिल्या आहेत.

प्राचीन काळी चीनी देशांत भारताला सर्वसाधारणपणे T'ienchu म्हणत असत. च्वांग यांच्या वृत्तांतात एका स्थळी या देशाच्या नावाचे विवेचन आले आहे. वॅटर्स यांनी केलेल्या भाषांतरातून त्याचा पुढील उतारा देत आहे.



"We find that different counsels have confused the designations of T'ien-chu (India); the old names were Shen-tu and Sien (or Hien)-tou; now we must conform to the correct pronunciation and call it yin-tu. The people of Yin-tu use local appelations for their respective countries, the various districts having different customs; adopting a general designation and one which the people like, we call the country 'Yin-tu' which means the 'Moon'". (Vol I, P.131).

['असे आढळून येते की, T'ien-chu (भारत) च्या नावाच्या बाबतीत अनेकांनी घोटाळा केला आहे. जुनी नावे Shen-tu आणि Sren (किंवा Hien) - tou होती. पण आता आपण वास्तविक उच्चारण करून Yin-tu म्हटले पाहिजे. Yin-tu चे लोक आपापल्या (प्र) देशासाठी स्थानिक नावे वापरतात; आणि विभिन्न विभागात वेगवेगळ्या चालीरीती आहेत. आपण एक व्यापक व जनतेला आवडणारे नाव वापरून या देशाला Yin-tu म्हणू, या शब्दाचा अर्थ चन्द्र आहे.']

च्वांग म्हणतात की, या देशाचे लोक आपल्याला प्रदेशांसाठी वेगवेगळी नावे वापरतात. हे साहजिक होते; कारण त्या काळात येथे मगध, अंग, वंग, कलिंग अशी अनेक राज्ये होती. पण तरीही पारंपरिक संस्कृति, संस्कृत भाषा, एकूण जीवनपद्धति आदि दृष्टींनी हा संपूर्ण देश एक आहे याची जाणीवही होती.

## भारताचे एक अन्य नांव 'इंदू'

च्वांग प्रथम त्यांनी या देशासाठी सामान्यतः ऐकलेली नावे सांगतात, Shen-tu व Hien-tou. यांतील दुसरे नाव भारतीय उच्चाराचा 'हिंदु' शब्द आहे. पहिले नाव सिन्धु भासू शकते. त्या विषयी एक स्पष्टीकरण पुढे प्रकरण ५ मध्ये दिले आहे. पण त्याशिवाय पश्चिम भारतातील सिन्धु प्रदेशाचे नाव परदेशात पुढील कारणाने कधी कधी वापरले जात असेल. चीन, मध्य आशिया, युरोप आदिशी प्राचीन भारताच्या दळणवळणाचा एक प्रमुख मार्ग त्या प्रदेशातून होता. तेथून बाहेर जाणारे भारतीय व्यापारी

विदेशियांशी बोलताना आपण 'सिन्धु' पासून आलो आहे असे म्हणत असतील. तसेच विदेशी व्यापारीही मालाच्या देवाणघेवाणसाठी त्या सीमाप्रदेशापावेतोच बहुधा पोचत असतील. म्हणून भारताला जाण्याच्या व भारतातून येण्याच्या प्रवासाचा उल्लेख करताना ते साधारणतः 'सिन्धु'चा निर्देश साहजिकच करत असतील.

पण ते काहीही असले तरी च्वांग स्पष्ट करतात की, त्यांच्या माहितीनुसार त्या सर्व नांवांच्या उच्चारांच्या मुळाशी वास्तविक नांव Yin-tu/In-tu (इंदु) हे आहे; आणि ते त्याचा 'चन्द्र' हा निश्चित अर्थहीं देतात! च्वांग यांच्या वृत्तांतातील वाक्यांचे वर उद्धृत भाषांतर देऊन वॅटर्स म्हणतात-

"...his words would seem to indicate that he regarded Tien-chu, Shen-tu and Sien-tou as only dialectical varieties or mistaken transcriptions of Yin-tu, which was the standard pronunciation." 'त्यांचा-च्वांगचा-आशय असा दिसतो की, त्यांच्या मताने Yin-tu हे सर्वमान्य प्रचलित उच्चारण असून, Tien-chu, Shen-tu व Sien-tou हे त्याचे केवळ प्रादेशिक बोलभाषेतील उच्चारभेद किंवा चुकीची रूपांतरे होत.')

वॅटर्स भारताच्या नावाच्या संबंधात च्वांगच्या शब्दांचे भाषांतर देताना,"...Yin-tu which means the moon" असे म्हणतात, तर Beal त्यांत (Vol II, P. 129) Yin-tu ऐवजी In-tu शब्द देतात, जो अधिकच स्पष्टपणे संस्कृत 'इंदु' शब्द आहे. ज्युलियन देखील फ्रेंच भाषांतरात (P.57) In-tou असे लिहून त्याला "(Indou)" असे जोडतात.

परंतु बील त्या In-tu शब्दाबरोबर असे लिहितात," In Chinese this name signifies the moon" हे काहीसे भ्रमोत्पादक आहे. In-tu (Indu) हा चन्द्रवाचक शुद्ध संस्कृत शब्द आहे, व तो मुळात चीनी भाषेचा आहे असा च्वांगचाही आशय नाही. या संबंधात Dr. Jonathan Chaves, (Professor of Chinese, George Washington University, Washington D.C.U.S.A.) यांनी मला कृपया पुढील



स्पष्टीकरण दिले असून, त्यांत त्यांनी मूळ चीनी वाक्यांचे स्वतः केलेले भाषांतरही दिले आहे.

"After talking with you I looked up the original Chinese text of 'Yuan Chwang'. Here is my own fresh translation directly from the original:

'As for the name of Tien-chu, there are various confused designations. In ancient times it was called Shen-tu, while others called it Hsien-tou. At present, we will follow the correct pronunciation, according to which it should be called Yin-tu. This word, Yin-tu, is what in Chinese we call 'yueh' (moon). 'Moon' has many names, of which this (Yin-tu) is one .... For in this land, sages and wise men have appeared in succession, guiding ordinary men and regulating things, just like the moon shining down, hence the name Yin-tu.'

Beal is correct in referring to 'Chinese', but his wording seems to suggest that the meaning is that 'Yin-tu' is the Chinese word for moon; of course, it means nothing of the kind. The original text clearly instructs the reader that Yin-tu is the Sanskrit equivalent of the Chinese word for moon, Yueh..... 'Yin-tu' and 'In-tu' are simply two different ways of romanizing the exact same characters. Sien-tou and Hieu-tou are also two different non-standard ways of romanizing the same name, Hsien-tou...". ("तुमच्याशी बोलण्यानंतर, मी युअन च्वांगचा मूळ चीनी लेख पाहिला. त्या मूळ लेखावरून मी स्वतः आताच केलेले हे भाषांतर देतो.

'टिएन-चू'च्या नावांसाठी विविध घोटाळ्याची संबोधने आहेत. प्राचीन काळी त्याला Shen-tu म्हणत असत, आणि अन्य त्याला

Hsien-tou म्हणत असत. वर्तमानसमयी आपण त्याचा खरा उच्चार करू, ज्या अनुसार त्याला Yintu म्हटले पाहिजे. हा Yintu शब्द ज्याला चीनी भाषेत आम्ही Yueh (चन्द्र) म्हणतो तो आहे. चन्द्रासाठी अनेक नावे आहेत, त्यापैकी हे Yintu एक आहे.... कारण खाली (पृथ्वीवर) प्रकाश पाडणाऱ्या चन्द्रासमान या देशात सामान्य जनांना मार्गदर्शन करणारे व घटनांचे नियमन करणारे संत व विद्वान लागोपाठ होत आले आहेत; म्हणून हे Yintu नाव.'

बीलने chinese चा केलेला उल्लेख बरोबर आहे. परंतु त्यांची शब्दयोजना असे सुचविणारी भासते की, Yintu हा चन्द्रासाठी चीनी शब्द असल्याचा (च्वांगच्या लेखाचा) अर्थ आहे. परंतु त्याचा तसा काही अर्थ नाही. (च्वांगचे) मूळ लेखन वाचकाला स्पष्ट सांगते की, Yintu हा चन्द्रासाठी असलेल्या Yueh या चीनी शब्दाचा समानार्थी संस्कृत शब्द आहे....Yintu व Intu हे केवळ अगदी तीच वर्णाक्षरे रोमन लिपीत लिहिण्याचे दोन भिन्न प्रकार आहेत. Sientu व Hien-tou हे देखील Hsien-tou हेच नाव रोमन लिपीत लिहिण्याचे दोन अप्रचलित प्रकार आहेत...")

यांत म्हटल्याप्रमाणे च्वांगचे कथन असे आहे की, भारतासाठी प्रयुक्त Yintu (यिंटु) शब्दाचा अर्थ चन्द्र असून, त्या अर्थाचा चीनी शब्द Yueh आहे. च्वांगचा आशय असा नव्हे की, Yintu स्वतःच (चन्द्रवाचक) चीनी शब्द आहे.

**'इंदुदेश' चा स्पष्ट उल्लेख.**

Watters च्वांगच्या आशया बाबद पुढील आणखी विचार व्यक्त करतात.

"Further, his language does not seem to intimate, as Julien understands it to intimate, that Yin-tu was the name for all India used by the inhabitants of the country. In some other works we find stated that Yin-tu was the native name for the whole country, AND INDU-DESA GIVEN AS THE ORIGINAL SANSKRIT TERM. Our author may have had the opinion but this does not seem to be the meaning of his statements here. On the contrary he apparently wishes us to understand that the natives of India had only designations of their own states, such as Magadha and Kausambi, and that they were without a general name under which these could be included. It was the peoples beyond as for example Turks, who gave the name Yin-tu, and the Hu who gave Sin-tu to a great territory of uncertain limits. Then the Buddhist writers of Kashmir, Gandhara, and other countries beyond India proper, seem also to have sometimes used the name Yin-to. But as I-ching tells us although this word may mean 'moon', yet it was not the current name for India. In Buddhist literature India is called Jambudvipa, and portions of it Aryadesa and Madhyadesa. One of the other names for India to be found in Buddhist literature is Indravardhana." (Vol I, pp. 131-32. Capitals mine). ["आणखी असे की, Yin-tu हे भारताचे निवासी संपूर्ण भारतासाठी वापरत असलेले नांव होते हा च्वांगचा आशय असल्याचे ज्यूलियन समजतात. पण च्वांगच्या विधानांचा तसा आशय दिसत नाही. अन्य काही ग्रंथात Yin-tu हे समग्र देशाला भारतीयांनी दिलेले नाव होते असे म्हटल्याचे, आणि **इंदुदेश हा मूळ संस्कृत शब्दप्रयोग दिल्याचे** आपल्यास आढळून येते. च्वांगचे तसे मत असेल. पण त्यांच्या प्रस्तुत विधानांचा तसा अर्थ दिसत नाही. याउलट असे दिसते की, ते (च्वांग) आपल्यास सांगू चाहतात की, भारताच्या रहिवाशांपाशी मगध, कौसंबी अशी केवळ राज्यांची नावे होती, आणि ज्यांत यांचा समावेश केला जाऊ शकेल असे व्यापक नांव त्यांच्याजवळ नव्हते. अनिश्चित सीमांच्या अशा विशाल भूभागाला ज्यांनी Yin-tu नाव

दिले ते तुर्क आणि Sin-tu नांव देणारे 'हू' असे बाहेरचे लोक होते. याशिवाय काश्मीर, गांधार व खास भारताच्या बाहेरील अन्य देशांच्या बौद्ध लेखकांनीही कधी कधी Yin-tu नाव वापरल्याचे दिसते. परन्तु ई-चिंग आपल्यास सांगतात की, जरी या शब्दाचा अर्थ चन्द्र असला, तरी ते भारतासाठी प्रचलित नाव नव्हते. बौद्ध साहित्यात भारताला जंबुद्वीप, आणि त्याच्या विभागांना आर्यदेश व मध्यदेश म्हटले आहे. बौद्ध वाङ्मयात भारतासाठी आढळणारे एक अन्य नाव इन्द्रवर्धन असे आहे."]

या देशासाठी Yin-tu हे एकमेव नाव अर्थातच नव्हते. पण ते जेव्हा उच्चारले जात असे तेव्हा संपूर्ण भारतासाठी असे हा च्वांगचा आशय आहे, हे ज्यूलियन यांचे म्हणणे यथार्थ दिसते. स्वतः Watters लिहितात की, अन्य काही (चीनी) ग्रंथात Yin-tu नाव समग्र भारतासाठी दाखविले असून, 'इंदुदेश' हा मूळ संस्कृत शब्दही दिला आहे; आणि वॅटर्स लिहितात की स्वतः च्वांग यांनाही ते मान्य असू शकेल. पण तरीही वॅटर्स म्हणतात की, Yin-tu नाव तुर्कांनी या विशाल देशाला दिले. ते या विधानाला काहीही आधार देत नाहीत. वॅटर्सनी ई-चिंगच्या केलेल्या उल्लेखाची चर्चा पुढे केली आहे.

या देशवासियांजवळ संपूर्ण देशासाठी स्वतःचे कोणतेही नाव नव्हते आणि परकीयांनी त्याला एक समग्र व्यापक नाव दिले हे Watters यांचे म्हणणे पूर्ण निराधार आहे. अशाच आरोपाचे आणखी एक उदाहरण पाहा. "मुसलमानो के आनेसे पहले इस पूरे देश का कोई एक नाम नहीं था। हर प्रांत का अलग अलग नाम या हर राज्य का नाम उसकी राजधानी के नाम से प्रसिद्ध था। जब फारसवालों ने इस देश के एक प्रांत पर अधिकार किया, तब उन्होंने उस नदी का नाम 'हिन्दहो' रखा जिसको सिन्ध नदी कहते है और अरबों की भाषा में जिसका नाम महरान है.... फारसवालों ने इसको 'हिन्दहो' कहकर पुकारा और इससे इस देश का नाम 'हिन्द' पड़ गया।" ('अरब और भारत के सम्बन्ध' लेखक सैयद सुलैमान नदवी, हिन्दी अनुवादक - रामचन्द्र वर्मा).



उपखंडासमान आकाराच्या या विशाल देशांत प्राचीन काळापासून अनेक प्रांत व राज्ये असून, त्यांची वेगवेगळी नांवे अर्थातच असतील. पण त्याबरोबरच समग्र देशासाठी आर्यावर्त, भारतवर्ष, अशीं नावेही प्रचारात होती. एकत्वाची ही भावना रामायण, महाभारत आदींत, महाकवि कालिदासाच्या ग्रंथात, आणि शंकराचार्यांच्या दार्शनिक लेखनांतही आढळून येईल. बृहदारण्यक उपनिषदांत एका स्थळी (४-१-१) मुनि याज्ञवल्क्य राजा जनकाला 'सम्राट' म्हणतात. त्या शब्दाचे स्पष्टीकरण देताना शंकराचार्य 'राजसेय यज्ञ करणारा स्वतंत्र राजा' असा अर्थ देऊन पुढे म्हणतात, 'समस्तस्य वा भारतस्य वर्षस्य राजा' (अथवा, 'समस्त भारतवर्षाचा राजा'). हा विशाल देश मुळात एक आहे याची येथील निवासियांना सदैव जाणीव होती. आणि तदनुसार समग्र भारतासाठी प्रचलित परंपरागत नांवाशिवाय एक आणखी मार्मिक नाव जनतेत रूढ व प्रिय झाले- 'इंदुदेश'. हे नांव स्वतः भारतातच उगम पावले असून ईराण्यांनी ते भारताला दिले नव्हते. हा 'इंदु' शब्द भारताच्या 'हिंदू' नावाचे मूळ आहे.

**भारतासाठी चीनी नावांच्या मुळात संस्कृत 'इंदु' शब्द**

च्वांगच्या प्रवासवर्णनाचे फ्रेंच भाषांतर करण्याव्यतिरिक्त, ज्यूलियन एका लेखात[1] भारताचे चीनीभाषिक नाव मूलतः चन्द्रवाचक 'इंदु' शब्द आहे हे स्पष्टपणे सिद्ध करतात. मी तो फ्रेंच भाषेतील लेख अमेरिकेतील university of Maryland मधील फ्रेंच व चीनी साहित्याच्या प्राध्यापकांनी कृपया केलेल्या साह्याने पुढीलप्रमाणे समजून घेतला आहे.

ज्यूलियन प्रथम बौद्ध ग्रंथ Ling-yen-tsi-tchou च्या आधारे म्हणतात की, भारतासाठी चीनी भाषेत प्रयुक्त Thien-tchou या नांवाचा अर्थ lune (म्हणजे 'चन्द्र') असून, तो संस्कृत 'इंदु'च्या समानार्थी शब्द आहे. ज्यूलियन पुढे लिहितात की, Thien-tchou (जो त्यांच्या अनुसार Chin-tou शब्दच आहे) याचे दोन पदांश संस्कृत 'इन् दु' या दोन

१ लेखाचे शीर्षक, "Thien'tchou, L'Inde" (Journal Asiatique, Paris, Aout 1847, pp. 90-91).

पदांशाचेच उच्चारभेद आहेत. यांतील द्वितीय पदांश tchou (जो Chin-tou मध्ये tou असा आहे.) ची अधिक फोड करीत ज्यूलियन म्हणतात की, त्याचा उच्चार tu अथवा du केला पाहिजे, आणि यासाठी ते (सत्राव्या शतकात रचित) Tching-tsccu-thong/ Cheng-tzu-t'ung या शब्दकोशाचा आधार देतात. यानंतर ते त्या शब्दकोशात निर्दिष्ट इतिहासकार Ssc-ma-thsien/ Ssu-ma-ch'ien[१] च्या आधारे म्हणतात की, वरील प्रथम पदांश Thien (Chin उच्चार Shen) चा उच्चार yuen/yuan केला पाहिजे; जो Khang-hi / K'ang-hsi शब्दकोशानुसार[२] Yun असाही होऊन yu-in च्या जवळजवळ समान आहे. शेवटी ज्यूलियन निष्कर्ष व्यक्त करतात की, अशा प्रकारे Inde/India (भारत) चे चीनीभाषी नांव त्यांगच्या अनुसार चन्द्रवाचक संस्कृत शब्द 'इंदु' Indou च्याच काहीशा भिन्न लेखनद्वारा In-tou/Yintu (Indou) असे लिहिले पाहिजे, परंतु त्याची भाषिक व्युत्पत्ति न जाणणाऱ्या अन्य चीनी प्रवासी लेखकांनी संस्कृत Indou (इन्दु) च्या दोन पदांशाचे काहीसे रूपांतर करून Thien-tou, Chin-tou, Yun-tou, Hien-tou, Thien-tchou अशा प्रकारे लिहिले असावे.

ज्यूलियन यांनी दिलेल्या या स्पष्टीकरणाचे महत्त्व पाहता, मी त्यांचा मूळ फ्रेंच लेखही येथे उद्धृत करतो. त्यांत प्रमुख शब्द चीनी लीपींत दिलेले असून, समानार्थी **संस्कृत शब्द 'इंदु' स्वतः ज्युलियन यांनी देवनागरीत दिलेला आढळून येईल.**

१. (Sima quin / Suh-mah chee-en); ईसवी सन पूर्व १४५ ते ८७; चीनचा महान इतिहासकार; Han वंशी सम्राट wu ti चा अधिकृत दरबारी इतिहासलेखक; चीनचा अतिप्राचीन काळापासून इतिहास सर्वप्रथम लिहिणारा.

२. K'ang-hsi tzu-tien; या शब्दकोशाची रचना चीनवर ई.स. १६६१ ते १७२२ पावेतो शासन करणाऱ्या (Ch'ing वंशी) सम्राट K'ang-hsi द्वारा नियुक्त विद्वानांनी केली होती.



[1] Suivant l'ouvrage bouddhique *Ling-yen-tsi-tchou* (liv. I, fol. 2), le mot *Thien-tchou* veut dire *lune* (en sanskrit *indou* इन्दु). On voit par cette étymologie, que les deux syllabes de ce mot sont altérées. et on a lieu de s'étonner que cette orthographe corrompue ait pu se conserver jusqu'à nos jours dans les écrivains chinois. Tâchons de remonter à l'origine de cette altération.

On lit dans le dictionnaire *Tching-tseu-thong*, au mot 竺 (vulgo *tchou*): dans 身毒 (vulgo *Chin-tou*), même mot que 天竺 (vulgo *thien-tchou*), le mot 毒 doit se prononcer comme 篤 *tou* (*dou*). Or, le son de 身毒 (vulgo *chin-tou*) a été changé en celui de 天篤 (vulgo *thien-tou*), puis on a abrégé le mot 篤 *tou* (*dou*) en 竺 (*Khang-hi* rapporte cette abréviation au mot 篤 *tou*); enfin l'abréviation 竺 *tou* (*dou*) a reçu le son de 竹 *tchou.*

Quant au caractère 身 (vulgo *chin*), suivant l'historien *Sse-ma-thsien* (c'est toujours le *Tching-tseu-thong* que nous citons), il doit se prononcer ici comme 捐 *yuen* (mot qui, dans *Khang-hi*, se prononce aussi *yun*, son très-voisin de *yu* ou *in*).

D'après ce qui précède, on s'explique bien comment le mot *Inde*, qui, d'après le voyageur *Hiouen-thsang*, doit s'écrire 印度 *in-tou* (*indou*), transcription phonétique du mot sanskrit इन्दु *indou* (lune), a pu être écrit (Cf. *Fan-i-ming-i-tsi*, liv. VII, fol. 8, et *Khang-hi*) par des voyageurs chinois, qui en ignoraient l'étymologie. 天毒 (*thien-tou*), 身毒 (*chin-tou*) et 身篤 (*chin-tou*), 捐毒 (*yun-tou*), 賢豆 *hien-tcou* (豆 *tcou* représente le son *dou* दु dans mon alphabet), et enfin 天竺 *thien-tchou*, par suite de l'altération des deux syllabes du mot sanskrit इन्दु *indou*, lune.

जरी ज्यूलियन Thien-tchou व Chin-tou हे एकच नाव मानतात, मला असे संभव वाटते की, प्रथमोक्त नाव विशेष रूपाने भारतासाठी असून, Chin-tou, जर त्याचा उच्चार Shen-tu केला जात असेल, सिंधु प्रदेशासाठी असू शकत होते; अथवा मग Chin-tou व shen-tu ही भिन्न नांवे असतील. या दृष्टीने मी वर Shen-tu ची चर्चा केली असून, पुढे प्रकरण ५ मध्येही केली आहे.

पण ते काहीही असले, तरी येथे हें ध्यानात घेणे आवश्यक व पर्याप्त आहे की, चीन देशात भारतासाठी प्रयुक्त Thien-tchou नांव मूलतः संस्कृत 'इंदु' नांव होते.

**भारताला 'इंदु' का म्हणत होते?**

चीनी लेखक भारताची जी नावे त्यांनी ऐकली होती त्यांच्या मुळांत 'इंदु' शब्द आहे असे सांगतात इतकेच नव्हे, तर त्याचे स्पष्टीकरणही देतात (जे त्यांना भारतात प्राप्त झाले असेल). हयुएन च्वांग यांच्या विवेचनाचा (Beal कृत भाषांतरातून) हा उतारा पाहा.

> "The moon has many names, of which this is one. For as it is said that all living things ceaselessly revolve in the wheel (of transmigration) through the long night of ignorance, without a guiding star, their case is like (the world), the sun gone down; as then the torch affords its connecting light, though there be the shining of the stars, how different from the bright (cool) moon; just so the bright connected light of holy men and sages, guiding the world as the shining of the moon, have made this country eminent, and so it is called In-tu". (Vol. II, p.129)[१] ['चन्द्रासाठी अनेक नावे आहेत, त्यातील हे एक आहे. कारण, ज्याप्रमाणे असे म्हटले जाते की, सर्व प्राणी दीर्घ अज्ञातरात्रीत मार्गदर्शक ताऱ्याच्या अभावी (पुनर्जन्माच्या) चक्रात सतत भ्रमण करीत असताना त्यांची अवस्था सूर्यास्तानंतर होणाऱ्या (पृथ्वीच्या) अवस्थेप्रमाणे असते, आणि त्यावेळेस, स्वच्छ (शीतल) चन्द्रापेक्षा अगदी वेगळे ताऱ्यांचे प्रकाशणे असले, तरी (चन्द्राचा) प्रकाश झोत सर्व वस्तूंना परस्पर सांधणारा उजेड देतो, त्याचप्रमाणे जगाला चन्द्रप्रकाशासमान मार्गदर्शन करणाऱ्या साधुसंतांच्या स्वच्छ प्रकाशाने या देशाला महान केले आहे व

१ च्वांगच्या या उद्धरणाचे एक अन्य इंग्रजी भाषांतर वर उद्‌धृत केले आहे.



म्हणून याला 'इंदु' म्हणतात.]

च्वांगच्या या स्पष्टीकरणानुसार भारतभूमी सदैव श्रेष्ठ विभूतींच्या परंपरेने धन्य राहिली आहे. या महान परंपरेत गौतम बुद्धाचाही समावेश आहे, मात्र ती परंपरा बुद्धापासून प्रारंभ झाली नाही, व बुद्धानंतर समाप्तही झाली नाही. पण Watters स्वतःच तसा मर्यादित संबंध लावून भगवान बुद्धरूपी सूर्याच्या अस्तानंतर सर्वत्र अंधार पसरला असा च्वांगचा आशय पाहतात (Vol.I,pp. 178-79). परन्तु च्वांगच्या विधानात भारतातील बुद्धपूर्व व बुद्धोत्तरही सर्व महान व्यक्तींचा समावेश आहे.

च्वांगच्या अनुसार भारतात केवळ बौद्ध लोक या देशाला 'इंदु देश' संबोधित करीत असत असे नाही. च्वांगला सर्वसामान्य भारतीय लोकांत हे नाव प्रचलित आढळून आले. 'इंदु देश' नांवाचा बुद्ध धर्माशी खास संबंध नाही. जेथे च्वांग बरेच दिवस राहिले त्या नलंद विश्वविद्यालयाचे स्वरूप केवळ बुद्धधर्मी नसून व्यापक भारतीय होते. तेथे बुद्धधर्मा व्यतिरिक्त वेद, वेदान्त, न्याय, व्याकरण, आयुर्वेद आदि भारतीय विद्यांचेही अध्ययन-अध्यापन होत असे[१]

वॅटर्सच्या विवेचनावरून दिसून येते की, च्वांगशिवाय अन्यही काही चीनी लेखकांनी अशा स्वरूपाचे स्पष्टीकरण दिले आहे की, रात्रिकालीन प्रकाशात जसा चन्द्र श्रेष्ठ तसा जगातील सर्व देशात हा देश श्रेष्ठ असल्याने याला चन्द्र (इन्दु) हे नाव दिले गेले.[२] वॅटर्स हेही लिहितात की, काही चीनी लेखक चन्द्रविषयक वरील स्पष्टीकरण देत नसले, तरी भारताला चन्द्रसूचक 'इंदु' नाव होते असा उल्लेख करतात.

वस्तुतः भारतीय प्राचीन काळापासून आपल्या देशाला सर्वश्रेष्ठ मानत आले आहेत. महाभारताच्या भीष्म पर्वात भारतवर्षाचे वर्णन करताना संजय म्हणतो -

१. पाहा A.L. Basham, "The wonder that was India". p. 166

२. 'इन्दु' शब्दाचा सर्वश्रेष्ठ या अर्थाने उपयोग कालिदासांनी 'रघुवंश' काव्यात "दिलीप इति राजेन्दुः इन्दुः क्षीरनिधाविव" (१-१२) यांत केला असून, 'राजेन्दुः' चा मल्लीनाथांनी 'राजश्रेष्ठ' असा अर्थ दिला आहे.

*अत्र ते कीर्तयिष्यामि वर्षं भारत भारतम्*
*प्रियमिन्द्रस्य देवस्य मनोर्वैवस्वतस्य च।।९-५*

" राजा धृतराष्ट्र, आता मी तुम्हाला देवेन्द्र व वैवस्वत मनूला प्रिय भारतवर्षाचे वर्णन सांगतो". विष्णुपुराणांत भारताच्या प्रशंसेत म्हटले आहे

*अत्रापि भारतश्रेष्ठ जम्बुद्वीपे महामुने....२ -३ -२२*

" महामुने (मैत्रेय), जंबुद्वीपांत भारत सर्वश्रेष्ठ आहे." भारतवासीयांना ज्याच्याविषयी इतका अभिमान होता[1] त्या आपल्या या देशाला त्यांनी 'इंदु' (= सर्वश्रेष्ठ) हे अतिरिक्त नांव देणे स्वाभाविकच होते. या 'इंदु' चे प्राकृतात 'हिंदू' रूपांतर झाले.



१.अकराव्या शतकात अल्बेरूनीलाही (प्रकरण ६ मध्ये उद्‌धृत) भारतीयांत अशीच धारणा आढळून आली.



प्रकरण ३

# 'अवेस्ता'चा 'हिंदू' शब्द भारतासाठी नव्हता

**ऋग्वेदीय 'सप्तसिन्धु'**

चीनी लेखकांनुसार भारताचे एक नाव संस्कृत शब्द 'इंदु' होते हे आपण मागील प्रकरणांत पाहिले. त्यापासून 'हिंदू' शब्द झाला. पण तरीही, भारताला 'हिंदू' नांव प्रथम ईराण्यांनी 'सिंधू'चा तसा उच्चार करून दिले ही भ्रामक धारणा इतकी दृढमूल झाली आहे की, तिचे साधार विस्तृत निराकरण आवश्यक आहे. या धारणेचे एक रूप प्रायः असे आहे.

ऋग्वेदात कोठे कोठे 'सप्तसिन्धु' शब्द आला आहे. त्यातील एका स्थळी त्याचा अर्थ केवळ 'सात नद्या' असा नसून 'सात नद्यांचा प्रदेश' असा आह. ऋग्वेदांतील ते वचन असे आहे. "य ऋक्षात् अंहसो मुंचत यो वाऽर्यात् सप्तसिन्धुषु। वधो दासस्य तुविनृम्ण नीनमः" (८-२४-२७; रा. वि. पटवर्धन कृत मराठी भाषांतर, 'हे इन्द्रा, तू असा आहेस की, घोर पातकापासून भक्ताची मुक्तता केलीस; किंवा हे अपार शौर्यसंपन्न इन्द्रा, तू सप्तसिंधूच्या प्रदेशात आर्यभक्ताच्या हातून, धर्मभ्रष्ट शत्रूंची घातक शस्त्रे वांकवून ती मोडून टाकलीस'). हा 'सप्तसिन्धू' शब्द इराणी धर्मग्रंथ झेंद अवेस्ता मध्ये 'हप्तहिन्दु' असा आढळून येतो; आणि (वरील धारणेनुसार) ते 'हप्तहिंदु' नांव भारत देशासाठी होते, व नंतर त्याचा 'हिंदु' असा संक्षेप झाला.

संस्कृत व अवेस्ता या भाषांत 'स = ह' भेदासह काही शब्दसाम्य आढळते हे खरे. उदाहरणार्थ, सखा (मित्र) = हखा; सप्त = हप्त; सेना = हेना; सेतु = हेतु. मात्र अवेस्ता भाषेत 'स' मुळीच नाही असे नाही. पुढील शब्द पाहा --- 'सतम्' (संस्कृत शतम्); 'सरअद' (संस्कृत शरद).

पण ऋग्वेदांतील तो 'सप्तसिन्धु' प्रदेश कोणता होता? सायन

भाष्यांत (ऋग्वेदांतील मंत्र १९-७५-५ च्या आधारे) त्या सात नद्या अशा सांगितल्या आहेत--गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्रि (सतलज), परुष्णी (रावी), असिक्नी (चिनाब), व वितस्ता (जेहलम). यांत प्रत्यक्ष सिन्धू नदीचा समावेश नसला तरी तिच्या शाखांचा आहे. डॉ. सम्पूर्णानंद तो 'सप्तसिन्धु' प्रदेश म्हणजे केवळ पंजाब व काश्मीर मानून त्या सात नद्यांची नांवे अशी देतात; वितस्ता, असिक्नी, परुष्णी, विपाशा (बियास), शुतुद्रि, सिन्धु व सरस्वती (पाहा "आर्यों का आदि देश" पृ. ४९, ५१); यांत गंगा व यमुना नाहीत.

### झेंद अवेस्ता मधील 'हप्तहिंदू'चा वास्तविक आशय

पण ऋग्वेदाचा 'सप्तसिंधू' बाजूस ठेवून, आपण त्या 'हप्तहिन्दू' शब्दावर विचार करू. तो शब्द इस्लामपूर्व झोरास्ट्रियन धर्मग्रंथ 'झेंद अवेस्ता'च्या 'वेन्दिदाद' खण्डाच्या प्रथम अध्यायात आला आहे. आणि त्याचा अर्थ 'सप्तसिन्धु' प्रमाणे 'सात नद्यांचा प्रदेश' असा होऊ शकतो. परन्तु, तो भारतातील एखादा प्रदेश होता काय? वेन्दिदादच्या त्या अध्यायात परम सत्तत्त्व आहुर मज्द त्यांनी निर्मिलेली सोळा विशिष्ट स्थाने सांगत आहेत. त्यांतील पंधराव्या स्थानाचे नांव 'हप्तहिंदू' असून, त्याचा उल्लेख त्या अध्यायाच्या एकोणिसाव्या (कांही आवृत्तीत अठराव्या) वचनात आला आहे.

अकराव्या शतकातील इस्लामी विद्वान अल-बेरुनी यांनी त्या 'हप्तहिन्दू' वर महत्त्वाचा प्रकाश टाकला आहे. ते प्रथम अशी माहिती देतात.[1] भारताच्या उत्तरेस पूर्वपश्चिम पसरलेल्या हिमालयादि पर्वतांच्या विशाल लांबरुंद रांगा आहेत. त्यांतून उत्तर व दक्षिण अशा दोन्ही बाजूंनी अनेक नद्या उगम पावतात. पैकी दक्षिणेकडील सिन्धु, गंगा, यमुना, सरस्वती आदि नद्या भारतांतून वाहात समुद्रास मिळतात. तसेच उत्तरेकडे उगम पावणाऱ्या अनेक नद्या तुर्कस्तानादि देशांकडे वाहात कास्पियन समुद्र, अरल सागर, कृष्ण समुद्र, बाल्टिक सागर इत्यादींना मिळतात.(p.

1.E. Sachau कृत इंग्रजी भाषांतर "Al-Beruni's India," Vol I. pp 197-198.



258) आणि इतके सांगून भारतातील पंजाबातून वाहणाऱ्या पाच नद्यांसंबंधात अल्बेरुनी म्हणतात--

"After these five rivers have united below Multan at a place called pancanada, i.e. the meeting place of the five rivers, they form an enormous watercourse.... The Muslims call the river after it has passed the Sindhi city Aror, as a united stream, the river of Mihran... it reaches Almansura... and flows into the ocean at two places near the city Loharani, and more eastward in the province of Kacch at a place called Sindhusagar i.e. the Sindha Sea". (Vol I.p. 260) ("या पाच नद्या मुलतानच्या खाली 'पंचनद' म्हणजे 'पाच नद्यांचा संगम' या नांवाच्या स्थानी एकत्र मिळाल्यानंतर त्यांचा एक विशाल जलप्रवाह होतो... 'अरोर' या सिन्धी शहराला पार केल्यावर एक संमिश्र नद झालेल्या त्या नदीला मुसलमान लोक 'मिहरान' नदी म्हणतात... ती 'अल्मन्सूर' ला पोचते... आणि 'लोहरानी' शहराजवळ दोन ठिकाणी व आणखी पूर्वेकडे कच्छच्या प्रांतात 'सिन्धुसागर' नामक स्थानी, समुद्रास मिळते".)

पंजाबच्या पाच नद्यांच्या संगमाची ही माहिती दिल्यावर अलबेरुनी म्हणतात--

"Eranian Tradition :- As the name 'union of the five rivers' occurs in this part of the world (in Panjab), we observe that a similar name is used also to the north of the above-mentioned mountain chains, for the rivers which flow thence towards the north, after having united near Tirmidh and having formed the river of Balkh, are called the union of the seven rivers. The Zorastrians of Sogdiana have confounded these two things; for they say that the whole of the seven rivers is Sindh, and its upper course Baridish". ["इराणी

परंपरा:- ज्याप्रमाणे जगाच्या या भागात -- पंजाबात-- 'पाच नद्यांचा संगम' (पंचनद) हे नांव प्रचलित आहे, तसेच वर उल्लेखित पर्वतरांगांच्या उत्तरेसही एक नांव आपल्यास आढळते; कारण त्या बाजूने उत्तरेकडे वाहणाऱ्या नद्या 'टिर्मिढ' जवळ एकत्र होऊन त्यांची 'बाल्क' नदी झाल्यावर त्यांना 'सात नद्यांचा संगम' असे नांव आहे. सोग्डियानाच्या झोरास्ट्रियनांनी या दोघांत घोटाळा केला आहे, त्या सात नद्यांचा संगम होऊन झालेली नदी 'सिन्ध' व तिचा वरचा प्रवाह 'बारीडिश' आहे असे ते म्हणतात.][1] आणि यावर भाषांतरकार स्वतःची पुढील टीप जोडतात-

"The Union of the seven rivers:- This tradition apparently refers to the hapta hendu of Avasta, Vendidad 1.73" (Vol II, p. 330)[2] ["सात नद्यांचा संगम :- या परंपरेचा संबंध अवेस्ता, वेंदिदाद १-७३ मधील 'हप्तहेंदू' शी दिसतो"].

अल्बेरुनी यांनी केलेला खुलासा स्पष्ट करतो की, झेंद अवेस्ताच्या त्या वचनांतील 'हप्तहिंदू'चा संबंध हिमालयाच्या उत्तर बाजूकडून वाहणाऱ्या नद्यांशी असून, भारताशी (केवळ 'सप्तसिंधु' शब्दाच्या उच्चारसाम्याव्यतिरिक्त त्याचा) काही संबंध नाही. हिमालयाच्या उत्तरेकडील त्या नद्यांत 'अमूदर्या' प्रमुख असून, तिचे जुने युरोपियन नाव OXUS व अरबी नाव Jayhun किंवा Jihun आहे. हिला बाल्क , पुंज, गुंट, कोक्चा, कुंडूर आदि नद्या येऊन मिळतात. हा तो 'हप्तहिंदू' प्रदेश होय. पण अल्बेरुनी यांनी म्हटल्याप्रमाणे **त्या 'हप्तहिंदू'चा संबंध चुकीने भारताशी लावला जात असतो.** या भ्रमाच्या वर उल्लेखित उदाहरणांशिवाय दोन आणखी पाहा. डार्मेस्टेटर (पू.उ.) वेंदिदादच्या त्या श्लोकांचे भाषांतर "the fifteenth of

१.J. Darmesteter (वेंदिदादच्या भाषांतरांत, S.B.E. Vol. IV) Sogdiana म्हणजे प्राचीन ईराणी नांव SUGUDA,(P.5), आणि SUGUDA म्हणजे आधुनिक समरकंद (p.२) असे म्हणतात.

२. यांत दिलेल्या ७३ आकड्याचा संबंध F. Spiegal's Avesta I, P. 5 शी असून, हे वेंदिदाद अध्याय १ मधील वर उद्धृत वचनच आहे.



the good lands and countries which, I, Ahura Mazda, created, was the Seven Rivers" असे देऊन, स्वतःच 'the Seven Rivers' (हप्तहिंदू) वर ही टिप्पणी देतात, "the basin of the affluents of the Indus, the modern Panjab (= the five rivers)," ("सिंधूच्या शाखांचे क्षेत्र, आधुनिक पंजाब = पाच नद्या"). आणि तसेच, Martin Haug (" The Parsis -- Essays on their sacred Language, Writings and Religion", p 230) या श्लोकाच्या भाषांतरांत haptahindu चा अर्थ "(the land of) seven rivers" असा देऊन, त्यांत स्वतःच (India) जोडून देतात.

हे लक्ष देण्यालायक आहे की,वेंदिदादच्या त्या अध्यायात 'हप्तहिंदू' शिवाय आणखीही अशी काही भौगोलिक नावे आहेत, जी भारतात प्रचलित संस्कृत नांवांच्या समान असूनही त्यांचा संबंध भारताशी न लावता भारतबाह्य प्रदेशांशी लावला गेला आहे. आहुर मझ्द द्वारा निर्मित सहाव्या उत्तम क्षेत्राचे नांव वेंदिदाद मध्ये Haroyu म्हटले आहे; ते भारतीय 'शरयू' नदीच्या नावांशी जुळत असले, तरी ते अफगाणिस्तानांतील Hari नदीचे क्षेत्र (अथवा Herat) मानले गेले आहे.[1] अशाच प्रकारे दहाव्या प्रदेशाचे नाव वेंदिदाद मध्ये Harahvati आहे; त्याचेही भारतीय 'सरस्वती' नावाशी स्पष्ट साम्य असूनही, त्या 'हरावती'ला काही लेखक[2] कझाकिस्तानची 'सरदर्या' नदी (जिला Jaxartes असेही नाव आहे), तर अन्य काही लेखक[3] आधुनिक Harut म्हणतात. हे पाहतां, वेंदिदादमधील 'हप्तहिंदू' प्रदेशही भारतातील मानण्याची आवश्यकता नाही.

एका लेखकाने अल्बेरुनींच्या त्या स्पष्टीकरणाकडे पुढील शब्दांत लक्ष वेधले आहे.

"The remark about confusing two countries under the name of the land of five or seven rivers deserves further investigation". ("Indo-Iranian Studies" , by Dr. J.C. Tavadia, 1950, p. 67). ['पाच

१. पाहा Darmesterter, पूर्वोक्त, 'Vendidad', p.7.

२. पाहा "Study of Indian History and culture", Vol I, p.147.

३. पाहा Darmesteter, पूर्वोक्त, pages 2,7.

अथवा सात नद्यांच्या प्रदेशाच्या नावाखाली दोन देशात घोटाळा केला गेल्याबद्दलच्या त्या विधानावर अधिक विवेचन आवश्यक आहे.'] याशिवाय एक अन्य लेखक स्पष्टच लिहितात---

"The expression hapta hindu, the Iranian (Vendidad, 1.18) equivalent of sapta sindhu further added to this confusion. The western writers believed that this expression referred to the Panjab. In support of this they point out RV. VIII, 24, 27 where sapta sindhu is used, according to them, as a place name referring to Panjab. We should remember here that the hapta hindu of the Avesta is actually a name of a mythical land encircled by the mythical rivers".[१] ["सप्तसिंधु'च्या इराणी (वेंदिदाद १-१८) समानार्थी 'हप्तहिंदु' शब्दप्रयोगाने या घोटाळ्यांत आणखीच भर टाकली. पाश्चिमात्य लेखकांना वाटले की, या शब्दप्रयोगाचा संबंध पंजाबशी आहे. त्याच्या पुष्ट्यर्थ ते ऋग्वेद ८-२४-२७ कडे बोट दाखवितात, जेथे त्यांच्या अनुसार 'सप्तसिंधु' हे पंजाबसाठी आलेले एक स्थल-नांव आहे. आपण येथे ध्यानात घेतले पाहिजे की, अवेस्तांतील 'हप्तहिंदु' हे वस्तुतः पौराणिक (काल्पनिक) नद्यांनी वेढलेल्या एका पौराणिक भूप्रदेशाचे नाव आहे."]

यांत वेंदिदादच्या 'हप्तहिंदु'चा संबंध काल्पनिक पौराणिक नद्यांशी दाखविला आहे; तर अल्बेरुनी तो हिमालयाच्या उत्तरेकडील प्रत्यक्ष नद्यांशी लावतात. मात्र दोघांच्याही मते त्याचा भारतातील कोणत्याही प्रदेशाशी संबंध नाही.

### झेंद अवेस्ताच्या पाठांत काही अतिरिक्त शब्द

झेंद अवेस्ताच्या काही (उदाहरणार्थ, वेस्टरगार्ड द्वारा संपादित) आवृत्तीत वचन १-१९ मधील त्या 'हप्तहिंदु' शब्दाला लागून सहा अतिरिक्त शब्द दिले असून, ते तेथे भारताच्या उल्लेखाचा भ्रम वाढविण्यास कारणीभूत झाले आहेत. Martin Haug ते शब्द रोमन (इंग्रजी) लिपीत

१. Article by B.R. Sharma, in Taraporevala Memorial Volume, 1957, Bulletin of the Deccan College Research Institute, Poona (p.290).



असे देतात (पूर्वोक्त, P 230), "haca ushastara Hindvà avi daoshatarem Hindum;" आणि त्याचा हा अर्थ देतात, "from the eastern (lit. more morning) Hindu to the western (lit. more evening) Hindu". वस्तुतः अवेस्ता भाषेतील hindu शब्दाचा अर्थ "A big river. a sea, a natural frontier formed by a big river or sea" (मोठी नदी, सागर, एखाद्या मोठ्या नदीमुळे वा सागरामुळे घडणारी नैसर्गिक सीमा) असा आहे[१]; पण Martin Haug (व अन्यही काही लेखक) येथे त्याचा अर्थ भारतदेश असा करतात. व या दृष्टीने वरील इंग्रजी लिपीकरणांत व भाषांतरांतही त्या शब्दाचे अद्याक्षर H मोठ्या आकाराचे दिले आहे असे दिसते.

परंतु, Paul Thieme[2] यांनी म्हटल्याप्रमाणे, त्या अवेस्ता hindu शब्दाचा वास्तविक अर्थ करणारे अन्य लेखक ते सहा शब्द असे लिहितात, "haca usastara hinduua auui daosastarem hindum."आणि स्वतः Paul Thieme अवेस्तामधील hindu शब्दाचा भारताशी संबंध नाही हे स्पष्ट करून त्या सहा शब्दांचे हे भाषांतर देतात, "from the eastern frontier to the to the western frontier. (पूर्व सीमेपासून पश्चिम सीमेपावेतो). हा भारतीय प्रदेश नसून, हिमालयाच्या उत्तरेकडील 'हप्तहिंदू' प्रदेश आहे.

पण याशिवाय असे की, ते सहा शब्द वेंदिदादच्या मूळ प्रमाणित पाठातील नाहीत. स्वतः वेस्टरगार्ड टीप देतात की, ते शब्द काही पोथ्यात नाहीत; आणि K.F. Geldner यांनी प्रकाशित केलेल्या पाठांत ते शब्द नाहीत. तसेच Darmesteter देखील वेदिंदादमधील त्या श्लोकाचे इंग्रजी भाषांतर देताना ते सहा शब्द समाविष्ट करीत नाहीत.

ते भ्रमात्मक सहा शब्द काही पोथ्यांत कसे घातले गेले? Martin Haug (पूर्व उल्लेखित,PP.52, 94) असे स्पष्टीकरण देतात. अवेस्ता

१) हे मला कृपया Dastur Dr. Firoze M. Kotwal, Ph, D. High Priest, H.B. Wadia Atash Bahram (J. Shankerseth Road, Bombay) यांनी एका पत्रात (27-2-84) कळविले आहे.

२) Article in W.B. Henning Memorial Volume, London, 1970, pp. 447-450.

भाषेतील मूळ रचनेवर मागाहून पहलवी भाषेत zend नामक टीका लिहिली गेली; त्या टीकेत भाष्यकाराने स्वतःचाही काही मजकूर अवेस्ता भाषेत जोडला. तो मूळ अवेस्ता पाठाहून वेगळा, पहलवी टीकेबरोबर, द्यावयास हवा होता. पण भाषेच्या साम्यामुळे तो मजकूर मूळ अवेस्ता पाठाबरोबर लिहिला जाऊ लागला; आणि कालांतराने त्यात मिसळला गेला. Haug विशेष रूपाने म्हणतात (P.230) की, वेंदिदाद मधील 'हप्तहिंदू'ला जोडले गेलेले ते सहा शब्द अशा प्रक्षिप्त स्वरूपात घातले गेले आहेत. पण ते काहीही असले, तरी आपण वर पाहिल्याप्रमाणे त्या सहा शब्दांचाही वस्तुतः भारताशी संबंध नाही.

**भारतीय महिलांचा अपमान**

आणखी असे की, वेंदिदादच्या त्या 'हप्तहिंदू'चा संबंध भारताशी लावणे भारतीय महिलांना घोर अपमानास्पद आहे. त्या वचनाच्या उत्तरार्धात म्हटले आहे की, आहुर मझ्द यांनी तो प्रदेश निर्माण केल्यावर दुष्ट अंग्रमैन्यूने तेथील स्त्रियांत एक गंभीर विकृति प्रविष्ट करून दिली. Darmesteter त्या उत्तरार्धाचे हे भाषांतर देतात. "Thereupon came Angra Mainyu, who is all death, and he countercreated by his witchcraft abnormal issues in women and excessive heat". आणि Martin Haug असे भाषांतर देतात, "Thereupon, as an opposition to it, Angremainyush, the deadly, formed untimely menstruations and irregular fever". (Op. cit. P.230). आणि सम्पूर्णानंदही भाषांतर करतात "तब मृत्युस्वरूपी अग्रमन्युने अपनी माया से स्त्रियों में असाधारण प्रसव और भीषण गरमी उत्पन्न की". (पू. उ.पृ. ६१). या विकृतीचा भारताशी काय संबंध? आणि ज्यांत महिलांवर (वास्तविक वा काल्पनिक) असा गंभीर दोष लावला गेला आहे, त्या विदेशी वचनामध्ये भारताचा निर्देश पाहणाऱ्यांत भारतीय विद्वानही समाविष्ट असावेत याहून अधिक खेदजनक काय असेल?

या भ्रमाच्या वर दिलेल्या उदाहरणांशिवाय आणखी एक पाहा. नारायण भवानराव पावगी "ऋग्वेदातील सप्तसिंधूचा प्रांत" पुस्तकांत



(पृष्ठे ११८-११९) लिहितात, "आता अहुरमज्दाने उत्पन्न केलेल्या वरील प्रदेशात हप्तहिंदूचा प्रान्त म्हणून जो सांगितलेला आढळतो, तो प्रस्तुत विषयाच्या संबंधाने निःसंशय विशेष रीतीने ध्यानात ठेवण्यासारखा व फारच महत्त्वाचा आहे. कारण, झेंद भाषेतील हप्तहिंदू म्हणजेच संस्कृतांतील सप्तसिन्धु असून, सप्तसिन्धुपदाने, पूर्वेकडील गंगानदीपासून तो तहत पश्चिमेकडील सिंधुनदीपर्यंतचा जो विस्तीर्ण प्रदेश जलसिक्त होतो, तोच समजावयाचा यांत अगदी शंका नाही. वेंदिदादमध्ये सप्तसिन्धु (हप्तहिन्दु) चा उल्लेख केला आहे. त्यावरून हा प्रांत त्यांजला प्रथमपासूनच चांगला माहीत होता. एवढेच नव्हे तर ह्या प्रांताशी त्यांचा पूर्व परिचय असून त्यात त्यांनी बहुत काळ घालविता व त्यांतील सातही नद्या त्यांजला केवळ मागील दाराप्रमाणेच अवगत होत्या; असे स्वयमेव सिद्ध होते." हे प्रतिपादन निःसंशय निराधार आहे.

**मूळ शाब्दिक घोटाळा**

प्राचीन ईराणियांनी भारताला संबोधित करण्यासाठी 'हिंदु' शब्द तयार केला या धारणेतील भ्रामकता आता वाचकांना उघड झाली असेल, ईराणी अवेस्ता भाषेत संस्कृतच्या 'सिंधु' शब्दापासून झालेला 'हिंदु' शब्द होता हे खरे; पण तो नदी, अथवा नदीचा (वा तत्समीप) प्रदेश, या आशयाचा असून खास भारतासाठी किंवा भारताच्या रहिवाशांसाठी नव्हता. उलट, भारतीयांनी देशाला व स्वतःला 'हिंदू' हे नांव लावले; पण ते 'सिन्धु'चे रूपांतर नसून त्याचा संबंध 'इंदु' (चन्द्र) या शब्दाशी होता.

वेंदिदादच्या प्रथम अध्यायाचे भाषांतर देताना Darmesteter (पूर्व उल्लेखित) पुढील प्रास्ताविक लिहितात,

> "Many attempts have been made, not only to identify these sixteen lands, but also to draw historical conclusions from their order of succession, as representing the actual order of the migrations and settlements of the Iranian tribes. But there is nothing in the text that would authorise us to look to it even for legendary records, much less for real

history. We have here nothing more than a geographical description of Iran; such as might be expected in a religious work like the Vendidad, that is to say, one that contains mythical lands as well as real countries." ['हे सोळा प्रदेश निश्चित ओळखण्याचे, आणि इतकेच नव्हे तर त्यांना दिलेला अनुक्रम प्राचीन ईराणी टोळ्यांच्या देशांतरांचा व वसाहतींचा प्रत्यक्ष क्रम दर्शविणारा आहे अशा स्वरूपाचे ऐतिहासिक निष्कर्ष काढण्याचे, अनेक प्रयास केले गेले आहेत. परंतू मूळ लेखांत असे काहीही नाही की ज्यांत आपण अधिकृत रीत्या प्रमाणित दंतकथा पाहू शकतो, वास्तविक इतिहासाची शक्यता तर आणखीच कमी. त्यांत आपल्यास ज्यांत पौराणिक प्रदेश व त्यांबरोबरच वास्तविक प्रदेशांचा उल्लेख आहे अशा वेंदिदादसारख्या धार्मिक ग्रंथात आढळण्याची अपेक्षा केली जाऊ शकते अशा ईराणच्या भौगोलिक वर्णनाशिवाय आणखी काहीही प्राप्त होत नाही.']

यांत वेंदिदादच्या त्या अध्यायाचे 'धार्मिक ग्रंथात अपेक्षित ईराणचे भौगोलिक वर्णन' असे उचित मूल्यांकन केले असून, त्यामुळे त्यांत भारताचा उल्लेख असण्याचे उघडच निराकरण होते.

वेंदिदादसह 'झेंद अवेस्ता' हा प्राचीन ईराणचा झोरास्ट्रियन धर्मग्रंथ आहे; आणि प्राचीन भारतवर्षाच्या कोणत्याही भागावर त्या धर्माचा केव्हाही प्रभाव नसल्याने, वेंदिदादमध्ये भारताचा कोणताही उल्लेख येण्याचे कारण नव्हते. त्या अध्यायात निर्दिष्ट सोळा प्रदेशांपैकी प्रथम प्रदेश "The Airyana Vaego by the (river) Vanguhi Daitya" आणि अंतिम प्रदेश "The land by the floods of the (river) Rangha" आहे. या दोन्ही नद्या "स्वर्गांतून पृथ्वीवर, एक पूर्वेत व दुसरी पश्चिमेत, आलेल्या दैवी नद्या" आहेत (उक्त pages २,३). ही प्राचीन ईराण्यांची पौराणिक धारणा होती; आणि त्या दोन नद्यांमधील भूमीत (पश्चिम) भारताचा कोणताही प्रदेश मानण्यास काहीही समर्थन नाही. पण तरीही डार्मेस्टेटरला अवेस्ता भाषेतील 'हिंदू' शब्द भारतीयांचे 'हिंदू' संबोधन मानण्याचा मोह अनावर होऊन, ते



लिहितात की, वेंदिदादच्या या अध्यायात उल्लेखित 'हप्तहिंदू' प्रदेश निश्चितपणे भारताचा पंजाब होय.[१]

### भारताशी चुकीने जोडलेली आणखी काही वचने

झेंद अवेस्ता मध्ये अन्यत्रही जेथे 'हिंदू' शब्द (अथवा त्याचे एखादे रूप) आहे, तेथे त्याचा संबंध व्यर्थ भारताशी लावण्याचा भ्रम अनेक विद्वानांना होत आला आहे. याचेही उदाहरण पाहा. 'Yasht 10-104' मध्ये मिथ्र ने शत्रूंवर हल्ला करण्याचे वर्णन आहे. त्या श्लोकाचा Ilya Gershevitch ("THe Avestan HYMN TO MITHRA" with an Introduction, Translation and Commentary, pp. 124-25) यांनी दिलेला पाठ पुढीलप्रमाणे आहे---

"................
ya ci u astraire hindvo gdurvayeite
ya ci daosataire niyne
.............."

यांत hindvo शब्द आला आहे; तो केवळ 'नदी' या अर्थाचा असून भारतासाठी नाही. आणि या दृष्टीने उक्त लेखकाने त्या श्लोकाचे हे भाषांतरही दिले आहे." (Grass-land magnate Mithra we worship,whose long arms reach out to catch the violators of the contract:) if (the violator is) by the eastern river he is caught, if (he is)by the western (river) he is struck down; (whether he is at the source of the Ranha, whether he is the middle of the earth), Mithra will be seizing him still, reaching round him with his two arms.". याचा आशय असा की, मिथ्र सर्वशक्तीशाली असून, शत्रू पूर्वेकडील नदीवर असो अथवा पश्चिमेकडील नदीवर असो- कोठेही असो - मिथ्र त्याला आपल्या बलवान हातांनी पकडून घेतो. हा भाषांतरकार 'हिंदवो'चा अर्थ

---

१. आपल्या या दोन परस्परविरोधी भूमिकांचा समन्वय करण्याच्या प्रयासात डार्मेस्टेटर एक असंभव कल्पना कशी व्यक्त करतात हे पुढे दाखविले आहे.

येथे नदी आहे हे स्पष्ट करण्यासाठी एक टिप्पणीही देतो, "On hindu-- 'river' cf. Markwart, Wehrot and Arang. 132 sq", (उक्त P. 233).

पण अन्य लेखक या श्लोकावरही भारताचा उल्लेख थोपतात. डार्मेस्टेटर हे भाषांतर देतात,

'...Mithra, the lord of wide pastures ...sleepless and ever awake...whose long arms, strong with Mithra strength, encompass what he seizes in the easternmost river and what he beats with the westernmost river..." (Sacred Books of the East, Vol. XVIII). या भाषांतरात भारताचे नाव नाही. पण डार्मेस्टेटर स्वतःच "The easternmost river वर "The Sind" अशी टीप देतात; वस्तुतः (या नद्यांना पौराणिक न मानता वास्तविक म्हटले तरी) अल्-बेरुनीने दिलेले स्पष्टीकरण ( व Balkh नदीचा सिंधू नदीशी घोटाळा केला जात असे हे त्यांचे विधान) पाहता या वचनांतील 'पूर्वेकडील अंतिम नदी' म्हणजे भारताची सिंधु समजण्याचे कारण नाही. स्वतः डार्मेस्टेटर म्हणतात (पू.उ.p3) की Oxus नदी (जी Balkh ला जाऊन मिळते) एक समयी चुकीने सिन्धु समजली जात असे; आणि तरी ते स्वतःही तशी चूक करू चाहतात.

पण A.V.W.Jackson ("Cambridge History of India", Vol. I, P. 325) एक पाऊल पुढे जाऊन, त्या वचनाच्या भाषांतरांतच नदी चा समूळ उल्लेख टाळून त्याऐवजी केवळ पूर्वेसच नव्हे तर पश्चिमेसही प्रत्यक्ष India दाखवतात. "The long arms of Mithra sieze upon those who deceive Mithra; even when in Eastern India he catches him, even when in Western (India) he smites him down...". मूळ वचनात hindvo म्हणजे 'नदीजवळ' असा शब्द असतां, हे भाषांतर तो संपूर्ण श्लोक एका टोकापासून दुसऱ्या टोकापावेतो (शत्रुस्वरूप) भारताशी संबद्ध मानते. आणि मग या Jackson चा आंधळेपणाने आधार देऊन एक अन्य लेखक A.T. Olmstead म्हणतात, "In the moderately early Mithra Yast, 10: 104 the god smites the foe in eastern and western India, as does Sraosha in imitation, Yasna 57:27" ("History of the Persian



Empire -- Achaemenid Period" P. 145, footnote); याचा आशय असा की, यश्ट १०-१०४ च्या अनुसार देव पूर्वीय भारतात आणि पश्चिम भारतात शत्रूचा नाश करतो, आणि तसेच करण्याचे यश्न ५७-२७ मध्ये म्हटले आहे. परंतु या श्लोकांत अशा प्रकारे भारताला खेचत आणणे (आणि तेही देवाला शत्रुस्वरूप) हे केवळ अवेस्तांतील नदी वाचक 'हिंदू' शब्दाचा चूक अर्थ लावणे आहे; आणि ती नदी, पूर्वेकडील असो वा पश्चिमेकडील, भारतांतील मानण्याचे काहीही कारण नाही.

आता यश्न ५७-२७ विषयी विचार करावयाचा झाल्यास, त्याचे L.H.Mills यांनी दिलेले भाषांतर असे आहे (S.B.E. Vol. XXXI). "We worship Sraosha (Obedience) the blessed, whose four racers draw in harness, white and shining...which from both the weapons (those on this side and that) bear the good Obedience the blessed, plunging forward in their zeal, when the takes his course from India on the East, and when he lights down in the west..." यांत Indiaचा प्रत्यक्ष उल्लेख आहे; जॅक्सन् यांनीही आपल्या भाषांतरात तो जोडला आहे. परंतु आपल्या आतापावेतोच्या विवेचनावरून स्पष्ट होईल की, हा देखील भाषांतरकाराचा मूळ पाठांत निराधार हस्तक्षेप आहे. YASNA 57:27 मध्ये जे सांगितले आहे ते Olmstead यांनीच म्हटल्याप्रमाणे, YASHT 10.104 चे अनुकरण (अथवा Jackson म्हणतात त्याप्रमाणे पुनरावृत्ति) आहे; म्हणून ज्या अर्थी YASHT च्या त्या वचनात वस्तुतः भारताचा उल्लेख नाही, त्या अर्थी उघडच YASNA मधील वचनाचाही भारताशी संबंध नाही.

अवेस्ताचा 'हिन्दु' शब्द पाहतांच, नदी किंवा समुद्र या त्याच्या अर्थाकडे यत्किंचितही लक्ष न देतां, कित्येकांच्या मनात सर्वप्रथम (व एकमेव) कल्पना 'इंडिया' (भारत) ची येते. याचे आणखी एक उदाहरण पाहा. YASHT VIII-32 मध्ये (Voura-Kasha या पौराणिक सागरात स्थित) Us-hindava नांवाच्या पर्वताचा उल्लेख आहे. त्या नांवाचे भाषांतर काही जण "Beyond (or,above) India' असे करतात; पण अन्य केवळ "The

mountain from which the rivers rise" ('ज्यापासून नद्या उगम पावतात असा पर्वत') असे करतात.[१]

पॉल थीम देखील (पूर्व उल्लेखित. पृ. ४४९) त्या नांवाचा India शी संबंध न लावता म्हणतात, " Yt. 8.32: The mountain situated in the middle of the Vourukasa lake is called ushandava---, hardly because it is 'situated beyond India' (thus Bartholomae), but rather because it rises 'beyond the natural frontiers' of the world (presumably formed, to one side, by the waters of the lake Vourukasa), and thus cannot be reached by man." उघडच त्या पर्वताच्या नावात भारताचा उल्लेख पाहणारे भाषांतर अवेस्ता भाषेतील 'हिन्दू' शब्दाविषयी गैरसमजुतीचा परिणाम आहे.[२]

अशाप्रकारे, अवेस्ताचा 'हप्तहिंदू' प्रदेश काही लेखक पश्चिम भारतात म्हणतात, तर काही भारताबाहेर उत्तर-पश्चिम दिशेस मानतात. पण तिसरे प्रतिपादन असेही आहे की, त्या 'हप्तहिंदू'मध्ये हे दोन्ही प्रदेश अंतर्भूत असून, त्याशिवाय मध्य आशियातील आणखीही काही भूभाग समाविष्ट होता. या मतानुसार अवेस्ताची 'हप्तहिंदू' भूमि ऋग्वेदांचील 'सप्तसिंधू' असून, तिचा एकूण विस्तार वर्तमान तुर्कस्तान व ईजिप्त सहित सीरिया, पॅलेस्टाइन, ईराण, अफगाणिस्तान, अझरबैजान, ताझिकीस्तान, उझवेक आदि समाविष्ट करीत पूर्वेस भारतीय सिंधु,

१) पाहा "Cambridge History of India", I, P.326

२) आवेस्ताच्या 'हिंदू' शब्दाबद्दल पसरलेला हा भ्रम पाहता. येथे जाता जाता पुढील खुलासा करतो. प्राचीन भारतीय 'ब्रह्मसिद्धान्त' ग्रंथाचा अरबस्तानात बराच प्रचार झाला होता. अल्बेरुनी यांनी त्या ग्रंथाचा अनेक वेळा उल्लेख केला आहे. आणि त्यांच्या ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतरात (पू.उ.) 'सिद्धांत' शब्द (त्याच्या अरबी उच्चारानुसार) sindhind, व कोठे कोठे तर SIND HIND असा छापला आहे. पण याचा 'सिन्ध पासून हिन्द' या तथाकथित रूपांतराशी काही संबंध नाही!



पंजाब व काश्मीर पावेतो होता[१]. आणि या दृष्टीकोनाने त्या सात नद्यांची नावे पश्चिमेस युफ्रेटिस पासून पूर्वेकडे सिंधूपावेतो दिली जातात. जर 'हप्तहिंदू' चा हा आशय मानला, तर ईराणी शब्द 'हप्तहिंदू' खास भारतासाठी होता असे म्हणणे अधिकच असंभव होईल; कारण त्या परिस्थितीत कॉकेशस पर्वत (व कास्पियन समुद्र) पासून सिंधू नदीपावेतोच्या साऱ्या देशांच्या लोकांना 'हिंदू' संबोधित केले गेले असते; पण तसे कोणाचेही प्रतिपादन नाही.



१) " Study of Indian History and culture", Bombay Vol I,1988 P. 147 (मराठी आवृत्ती "भारतीय इतिहास व संस्कृतीचा यथार्थ अभ्यास" खंड १ 'प्रारंभ काळ' पृ. )

प्रकरण ४

# ईराणी सम्राट दारियस चे शिलालेख

## पर्सेपोलिसचा शिलालेख

'हिन्दू' असा आणखी एक प्राचीन ईराणी उल्लेख, जो भारतीयांसाठी आहे असे म्हटले जाते, सम्राट दारियसच्या शिलालेखात पाहिला जातो. ईसवी सन पूर्व पाचव्या शतकात (Achaememid वंशी) Darius ईराणचा राजा होता. त्याच्या शिलोलखांत त्याच्या साम्राज्यांतील प्रान्तांची नावे दिली आहेत. बेहिस्तून येथील शिलालेखांत 'गंधार'चे नांव आहे. आणि पर्से-पोलिस येथील शिलालेखात, व Naqsh-i-Rustam ला दारियस च्या कबरीवर खोदलेल्या लेखांत, Hidus (Hindus/Hindush) चे नाव आहे; त्याचा अर्थ पश्चिम भारत असा केला जाऊन, दारियसने त्या भारतीय प्रदेशावर बेहिस्तूनच्या शिलालेखानंतर आक्रमण केले होते असे म्हटले जाते.

परंतु तो 'हिंदुस' शब्द वेंदिदादच्या 'हप्तहिंदू' सारखाच असून, पर्सेपोलिस शिलालेखांत सम्राट दारियस धर्मग्रंथ 'अवेस्ता' (ज्याचा वेंदिदाद प्रथम खंड आहे) चे सर्वेश्वर आहुर मझ्द ची विशेष रूपाने कृपा मागत आहे. त्या लेखाच्या इंग्रजी भाषांतरातील हे उद्धरण -

"Great Ahuramazda, who is chief of the gods, who has established Darius as king, he has given to him the kingdom. By the favour of Ahuramazda, Darius is king. Says Darius the king : This land Parsa, which Ahuramazda has granted me, which is beautiful, possessing good horses and good men, by the favour of Ahuramazda and of me, Darius the king, it has no fear of an enemy... Says Darius the king : By the favour of Ahuramazda, these are the lands



which I hold, together with this Persian army which fears me; to me they brought tribute...". (Quoted by Olmstead, p 175).

यांत दारियस म्हणतो की, आहुरमझ्दच्या कृपेने त्याला Parsa (Persia ईराण) चे राज्य प्राप्त झाले, व आहुरमझ्दच्या कृपेने हे सारे प्रदेश व ईराणी सेना त्याच्या अधीन आहे. मागील प्रकरणात पहिल्याप्रमाणे 'झेंद अवेस्ता' मध्ये स्वतः आहुरमझ्दच्या वचनात (आणि अन्यत्रही कोठेकोठे) 'हिंदू' सारखा शब्द आला असून, त्याचा भारताशी संबंध नाही. म्हणून, दारियसच्या त्या शिलालेखात आहुरमझ्दला उद्देशून व्यक्त श्रद्धापूर्ण उद्गार पाहतां, त्या 'हिंदू' (हेंडू) शब्दाचा तेथेही तसाच आशय पाहणे सयुक्तिक होईल. किंबहुना, काही लेखकांनी पर्सेपोलिस शिलालेखातील Hindush आणि अवेस्तामधील Haptahindu हे एकच मानलेही आहेत.[1] असे आहे तर तो Hidus (Hindus) देखील भारताच्या बाहेरचा, अनेक नद्यांनी युक्त अथवा समुद्रासमीपचा प्रदेश असला पाहिजे. दारियसच्याच प्रान्तांत अशा प्रकारचे एक अन्य उदाहरण (इंग्रजी भाषांतरानुसार) "The peoples of the Sea" नांवाच्या प्रदेशात आढळून येईल (पाहा Clement Huart पू.उ. P.74)

पण तरीही पर्सेपोलिस लेखात दिलेल्या प्रान्तांच्या यादीत India चे नांव समाविष्ट करून Erich Schmidt ("Persepolis", Vol.I, 'Structures, Reliefs, Inscriptions', P.39) त्या लेखाच्या इंग्रजी अनुवादांत म्हणतात,"India (Hindus = Sind = Indus valley) also enumerated in the list of nations, had become a satrapy sometime before 513".

पण त्या लेखात Hidus (Hindus) याला भारतातील 'सिंध' का

1) पाहा Olmstead पू.उ.p.145, footnote 46. आणि "About 512 Darius descended into the Punjab (Hapta-Hindu) and conquered extensive territory, which was made into a new satrapy, that of India, which is not mentioned in the Behistun inscription, but appears in the list at Persepolis." (Clement Huart, "Ancient Persia and Iranian Civilization", p. 55).

मानावे? त्याच शिलालेखांत एका अन्य प्रदेशाचे नाव Harauvatis आहे; पण त्याचे भारतातील 'सरस्वती' नदीच्या नावांशी साम्य असूनही त्याला भारताबाहेरचा Arachosia मानले गेले आहे. याशिवाय, मी मागील प्रकरणात 'वेंदिदाद' मधून काही अन्यही भौगोलिक नावे उद्धृत केली असून, त्यांचे भारतीय नावांशी उच्चारसाम्य असले, तरी त्यांना भारतबाह्य देशांशी संबद्ध मानले जाते. म्हणून दारियसच्या शिलालेखातील Hindus शब्द भारतीय 'सिंध'च्या उच्चाराशी समान दिसतो हे त्याला भारतीय सिंध प्रदेश म्हणण्याचे पर्याप्त कारण नाही. आणखी असे की, या विषयावर लिहिणारे प्रायः तो शब्द Hindus/Hindush असा उद्धृत करतात, पण शिलालेखांत तो Hidus असा आहे.[1] तो Hindus असाही मानला, तरी वर म्हटल्याप्रमाणे त्याला भारतीय प्रदेश मानणे आवश्यक नाही.

परंतु दारियसच्या क़बरीवरील मुख्य लेखांतील त्या Hindus ला भारतीय प्रदेश मानले, म्हणजे स्वाभाविकच कबरीच्या बाहेरील भिंतीवर चित्रित Throne-bearers and Tribute-Bearers (सिंहासनवाहक व खंडणीदेयक) व्यक्तींच्या देशांची ओळखण करण्यावरही त्याचा प्रभाव पडतो. जरी त्यांतील अनेक आकृती आता बऱ्याच अंशी नष्ट (अस्पष्ट) झाल्या आहेत, तरी कबरीच्या मुख्य लेखांत ज्या क्रमाने देशांची नावे दिली आहेत त्याच क्रमाने विद्वान त्या बाहेरच्या भिंतीवरील आकृतींचेही देश ठरविण्याचा प्रयास करीत असतात. म्हणून, ज्या अर्थी मुख्य लेखांत Hindus तेरावा देश आहे त्या अर्थी तेराव्या सिंहासनवाहकाची आकृति Indian (भारतीय) म्हटली जाते.[2] त्या आकृतीत दाढी व पाठीकडे वळविलेला केसांचा झुबका दाखविला आहे. माझ्या विचारानुसार Hindus = Sind हे गृहीत समीकरण बाजूस ठेवले, तर ती आकृती ईसवीसन पूर्व पाचव्या

१) पाहा Roland G. Kent's article "Old Persian Texts", Journal of Near Eastern Studies, University of Chicago, Vol.II, 1943, pp. 302-06.

२) पाहा Erich Schmidt,"Persepolis", पूर्वउल्लेखित Vol.III, "The Royal Tombs and other Monuments", Figure 45 and the facing table.



शतकांतील सर्वसाधारण भारतीय व्यक्तीची मानणे उचित नाही.

पर्सेपोलिसच्या शिलालेखात २६ देशांची नावे दिली असून[1], त्यांत Hidus तेविसाव्या स्थानावर आहे. Naqsh-i-Rustam च्या लेखांत ती २६ नावे (क्रमांत व काही नांवांच्या अक्षरात बदल करून आणि Hidus तेराव्या स्थानावर देऊन) दिली असून चार आणखी देश जोडले आहेत.

या संदर्भात old Persian (जुनी ईराणी), Elamite आणि Akkadian या तीन भाषांत लिहिलेल्या प्राचीन ईराणी लेखांच्या अनुवाचनात व अर्थ लावण्यात होणारी सूक्ष्म कठीणताही ध्यानात घेणे आवश्यक आहे. कॅमेरॉन[2] प्रत्यक्ष शिला व तिच्या उत्कृष्ट छायाचित्रांचे सूक्ष्म अध्ययन करून लिहितात की, पर्सेपोलिस शिलालेखात "....parauvaiya" असा वाचला गेलेला शब्द ".....para dara-ya" असा वाचला पाहिजे; त्याने त्याचा प्रचलित आशय मूलतः भिन्न होऊन जातो. तसेच शिलालेखात निर्दिष्ट प्रदेशांच्या ओळखण संबंधात Ronald G. Kent (पू.उ. P.304) म्हणतात की Maka देश दक्षिण बलुचिस्तानचा Makram असेल, अथवा अरबस्तानामधील ओमानच्या खाडीच्या दक्षिणेकडील macae प्रदेश असू शकतो. शिलालेखांतील काही प्रदेश विशिष्ट नावांऐवजी त्यांच्या स्थानाने दिग्दर्शित केले आहेत. उदाहरणार्थ, पर्सेपोलिस शिलालेखांतील तेरावा देश Dahyava tya para draya (also deciphered as Dahayaava tayaa para daraya) म्हटला असून, त्याचा अर्थ "The lands that are beyond the sea" असा आहे.[3]

### हेरोडोटस कृत 'इतिहास'

दारियसच्या शिलालेखांत Hidus चा भारताशी संबंध लावणारे ईसवी सन पूर्व पाचव्या शतकातील ग्रीक इतिहासकार हेरोडोटसलाही उद्धृत करतात. हेरोडोटस रचित सुप्रसिद्ध "History"[4] मध्ये ईराणच्या

१) पाहा Roland G.Kent's article (पूर्वउल्लेखित).

२) G.E. Cameron (Article "Darius, Egypt and the 'the lands beyond the Sea'", Journal of Near Eastern Studies, Vol. II, pp. 307-313).

३) पाहा Roland G. Kent (पू.उ.) व G.E. Cameron (पू.उ.)

४) English translation by G. Rawlinson in 'Great Books of the Western World' (Vol.6.)

सम्राट दारियसचाही वृत्तांत आहे. हेरोडोटस म्हणतात की Indians हा दारियसचा वीसावा प्रान्त होता; आणि विद्वान याचा संबंध प्रायः दारियसच्या लेखांतील Hindus शी लावतात. या दृष्टीने A.L.Basham लिहितात--

> "in an inscription of about 519 B.C.Darius I, the third of the Achaemenid emperors, claims possession of Gandhara, and in a slightly later inscription he also claims Hindush, or 'India', which according to Herodotus, became the twentieth satrapy of the Persian empire. The extent of the Persian province of Hindush is not certain, but it probably included much of the Punjab".[1] ['ई.स.पूर्व अंदाजे ५१९च्या शिलालेखात ॲकेमेनिडवंशी तृतीय सम्राट प्रथम दारियस गंधारवर आपला ताबा म्हणतो, आणि काही थोड्याच समयानंतरच्या शिलालेखात तो आपले स्वामित्व Hindush अथवा इंडिया वरही दाखवितो, जो हेरेडोटसच्या अनुसार त्या ईरानी साम्राज्याचा वीसावा प्रान्त झाला. त्या ईराणी प्रांत Hindush चा विस्तार किती होता हे निश्चित नाही, परंतु संभवतः त्यांत पंजाबचा बराचसा भाग होता.']

यांत हे गृहीत आहे की, हेरेडोटस ज्याला The satrapy of Indians म्हणतात तो प्रदेश दारियसच्या लेखांतील Hidus/Hindus/Hindush होता. अशाच प्रकारे Olmstead 'दारियसचा पश्चिम भारतावरील विजय' विषयावर लिहिताना म्हणतात,"Western India was subdued and sometime before 513 had been formed into the satrapy of Hindush" (पू.उ. p. 145); आणि यासाठी ते हेरोडोटसचा आधार देतात. यांतही हे गृहीत आहे की, हेरेडोटसने the satraphy of Indians चा उल्लेख उपरोक्त शिलालेखांतील Hindush च्या आधारावर केला होता. हे कितपत वास्तविक आहे?

पर्सेपोलिसच्या लेखांत एकूण २६ प्रान्त दिले असून Hidus तेविसावा आहे, आणि Naqsh-i-Rustam च्या लेखात तीस प्रान्त दिले असून

1) "The Wonder that was India", P.48



Hidus तेरावा दाखविला आहे. हेरोडोटसने आपला ग्रंथ सम्राट दारियसच्या निधनानंतर काही काळ गेल्यावर लिहिला; त्यांत त्यांनी त्या साम्राज्याला वीस प्रान्तांत विभाजित केले, व 'Indians' हा शेवटचा प्रान्त दाखवून म्हटले आहे,"The Indians, who are more than any other nation with which we are acquainted.... This was the twentieth satrapy." (Rawlinson G.B.W.W.P.110). हेरेडोटसचा 'Indians' विषयी हा सांख्यिक अंदाज समग्र Indo साठी असेल, अथवा त्यांच्या भारताविषयी (पुढे दाखविल्याप्रमाणे) ज्या भ्रामक कल्पना होत्या त्यांवर आधारीत असेल. पण विशिष्ट गोष्ट अशी की, हेरोडोटस दारियसच्या वर निर्दिष्ट शिलालेखांचा काहीही उल्लेख करीत नाहीत; मात्र दारियसला ईराणचा राजा होण्यात ज्यांचे साह्य झाले त्या एका घोड्याचा व घोडेस्वाराचा उल्लेख त्याने दगडावर कोरलेल्या ज्या एका लेखात केला आहे त्या लेखाचा संदर्भ हेरोडोटस देतात. याउलट, हेरोडोटस त्या सम्राटाला प्रांतांकडून प्राप्त होणाऱ्या खंडण्या सांगतात, पण ती माहिती दारियसच्या शिलालेखांत नाही. ती माहिती (विश्वसनीय असो वा नसो) हेरोडोटसला आणखी कोणत्या तरी स्त्रोताकडून मिळाली असली पाहिजे. ती माहिती देणारा कोण होता, व त्याने हेरोडोटसला 'the satrapy of Indians' बद्दल सांगताना कोणता विशिष्ट शब्द वापरला याचा आपल्याला काहीही पत्ता नाही.[1] आणखी असे की, हेरोडोटसच्या यादीतील प्रादेशिक नावे व शिलालेखातील नावे यात पूर्ण सुसंगति नाही. हेरोडोटसने दिलेली काही नावे शिलालेखात नसून, शिलालेखांतील काही नावे हेरोडोटसने दिलेल्या यादीत नाहीत. "There has been continued discussion of Darius' lists of peoples and complaint against Herodotus that his list of satrapies or financial districts in Book III fails to correspond with

1) एक तुलनात्मक उद्धरण पाहा, "....the curious absence of the name Arachosia, Arachotoi (Pers. Harauvatish), which is in all the Persian lists but nowhere in Herodotus at all. For some reason unknown, his source must have used a different name for this country... ". (A.R. Burn,"Persia and the Greeks", P. 120).

them". (Rawlinson, P.590; see also PP. 110-111) ['दारियसच्या (ताब्यातील) लोकांच्या याद्यांबद्दल सतत चर्चा होत आली असून, हेरोडोटस विरुद्ध तक्रार केली गेली आहे की, त्याच्या Book III मध्ये दिलेली प्रांतांची अथवा आर्थिक प्रदेशांची यादी त्या याद्यांशी जुळत नाही.']. म्हणून हेरोडोटसच्या satrapy of Indians ला दारियसच्या शिलालेखातील Hidus/ Hindush समानार्थी मानण्याला स्पष्ट आधार नाही.

पण दारियसच्या शिलालेखांतील Hidus शब्द भारतासाठी न मानला, तरी हेरोडोटस ने म्हटलेल्या दारियसच्या Indians प्रान्ताचे काय स्पष्टीकरण?

(पश्चिम) भारतावर दारियसच्या विजयाविषयी हेरोडोटसच्या कथनाची, वरील शिलालेखांतील Hidus भारतीय 'सिंध' गृहीत धरण्याशिवाय, काहीही खात्रीलायक पुष्टि नाही. आणि तसे गृहीत धरून ती पुष्टि करू पाहणे हा 'जे सिद्ध करावयाचे तेच गृहीत धरणे' या स्वरूपाचा तर्कदोष होईल. (सम्राट दारियसच्या त्या तथाकथित विजयासाठी) "There is no testimony to this beyond the authority of Herodotus and the doubtful voyage of Skylax down to Indus. ("Encyclopedia Asiatica", Cosmos Publications, New Delhi, Vol. III, p. 891). स्कायलॅक्सचा तो 'शंकास्पद' जलप्रवास दारियसच्या पश्चिम भारतावरील तथाकथित स्वारीच्या पूर्वी झाला होता; आणि स्कायलॅक्सचा मूळ लेख आता उपलब्ध नाही. हेरोडोटसने दिलेल्या वर्णनानुसार दारियसने स्कायलॅक्ससहित काही जणांना अशा नदीच्या प्रवाहाचा मार्ग शोधण्याचा आदेश दिला होता 'जिच्यात मगर होते'. म्हणून ते प्रवासी Kaspatyros शहरापासून आरंभ करून त्या नदीत पूर्वेकडे गेले, आणि समुद्रापावेतो पोचल्यावर पश्चिमेकडे वळून शेवटी ईजिप्तला पोचले. या कथनांत आधुनिक विद्वान Kaspatyros म्हणजे गंधार व ती नदी सिंधू मानू चाहतात. परंतु हेच विद्वान म्हणतात की, सिंधू पूर्वगामिनी नाही, व तिच्याच मगरही नाहीत, आणि ते जलप्रवासी सिंधूच्या मार्गाने गेले असते तर शेवटी ईजिप्त ऐवजी ईराणच्या खाडीला

1) A.R.Burn,"Persia and the Greeks", PP. 116-17.



पोचले असते.[१]

हेरोडोटसचे कथन उघडच त्यांना त्यांच्या ईराणी माहितगाराने जे सांगितले असेल त्यावर आधारित आहे; आणि त्यांत त्यांनी दूरवरच्या भारताबद्दल जे आणखी काही ऐकले होते तेही जोडून दिल्याचे दिसते. ते लिहितात की, त्या देशाचे काही लोक, ज्यांना ते Padaens म्हणतात, कोणी आजारी झाला अथवा वृद्ध होऊन मरणासन्न झाला, तर त्याला मारून टाकतात व 'त्याच्या शरीराचे भोजन करतात' (पू. उ. iii-99,100). काही लेखकांनुसार हेरोडोटसने कोठे कोठे भारतीयांचा ॲबिसीनियन लोकांशी घोटाळा केला आहे असे दिसते.[१]

म्हणून दारियसने पश्चिम भारताच्या काही भागावर कबजा केला होता असे हेरोडोटसला प्रमाण मानून म्हटले, तरी त्याचा संबंध त्या शिलालेखांतील Hidus/Hindush शब्दाशी लावणे आवश्यक नाही. तो प्रदेश दारियसने अन्य एखाद्या प्रान्तांत जोडला असेल. हेरोडोटस म्हणतात की, दारियस साधारणतः समीपवर्ती प्रदेशांना एका प्रान्तांत जोडत असे, पण कधीकधी समीपवर्ती जातीऐवजी दूरस्थ जातींनाही मिळवत असे (पू.उ.iii-89).

**'हप्तहिंदू' व 'हिडुस'चा संबंध भारताशी नसण्याचे स्पष्ट संकेत.**

वेंदिदादचा 'हप्तहिंदू' व दारियसचा Hidus/Hindus शब्द भारतासाठी मानण्याने डार्मेस्टेटरला एक असंभव भूमिका घेणे कसे भाग पडले हे पाहण्यासारखे आहे. वेंदिदादच्या प्रथम अध्यायांतील प्रदेशांच्या यादीच्या संदर्भात ते लिहितात-

"If we assume that only lands belonging to the Iranian world were admitted into the list, the mention of the seven

१) पाहा M.G. Rawlinson, पु.उ. P.19. अशाच प्रकारे, आद्य ग्रीक भूगोलशास्त्रज्ञ व भारतदेशाचा उल्लेख करणारा सर्वप्रथम ग्रीक लेखक Hecatacks (याची मूळ रचना आता लुप्त झाली असून केवळ अंशाअंशाने उपलब्ध आहे) एका जागी भारताचा आफ्रिकेशी घोटाळा करतो. (उक्त, Footnote 5).

rivers would indicate that the first Fargard was not composed earlier than the time when the basin of the Indus became a part of Iran, that is, not earlier than the reign of Darius the First." (पू.उ.P.4) ['जर आपण असे धरून चाललो की, केवळ ईराणी राज्याचे प्रदेश त्या यादीत समाविष्ट केले गेले, तर त्या यादींतील सात नद्यांचा उल्लेख दर्शवील की, तो प्रथम अध्याय इंडस नदीचा प्रदेश ईराण राज्याचा भाग होण्यापूर्वी, म्हणजे दारियस प्रथमच्या शासनकाळापूर्वी रचला गेला नव्हता'.]

'वेंदिदाद' मध्ये दिलेल्या प्रदेशांच्या यादीत 'केवळ ईराणचे अपेक्षित एक भौगोलिक वर्णन आहे' अशी रास्त भूमिका व्यक्त केल्यानंतर (वर उद्धृत), पण त्याबरोबरच 'वेंदिदाद' मधील 'हप्तहिंदू' शब्द पश्चिम इंडियासाठी आहे असा भ्रामक ग्रह धरून ठेवल्याने, 'वेंदिदाद'चा प्रथम अध्याय दारियसनंतर रचला गेला असावा अशी कल्पना करणे डार्मेस्टेटरला भाग होते. परंतु धर्मग्रंथ 'वेंदिदाद'चा प्रथम अध्याय, ज्यांत सर्वेश्वर आहुर मझ्दने केलेली श्रेष्ठ प्रदेशांची निर्मिती वर्णिली आहे, मानव सम्राट दारियसने (जो आहुर मझ्दच्या कृपेने मी विशाल राज्य प्राप्त केले असे परम श्रद्धेने म्हणतो) पश्चिम भारतावर तथाकथित विजय प्राप्त केल्यावर रचला गेला असे 'वेंदिदाद'चा क्वचितच कोणी उपासक मान्य करेल. तसेच महापावन धर्मग्रंथ 'अवेस्ता' मध्ये परम देवता द्वारा 'भूमि निर्माण' ईराणच्या एका इतिहासकालीन शासकाच्या सैनिक विजयावर आधारित असेल असेही 'अवेस्ता'चा कोणी अनुयायी क्वचितच मान्य करेल. वस्तुतः डार्मेस्टेटरचा हा सारा घोटाळा 'अवेस्ता'चा 'हेंडू' शब्द 'इंडिया' म्हणजे भारतासाठी आहे या भ्रामक ग्रहाचा परिणाम आहे. वस्तुतः ( अलबेरुनी ने खुलासा केलाही आहे तदनुसार) वेंदिदाद मध्ये निर्दिष्ट 'हप्तहिंदू' प्रदेश ईराणकडीलच होता, भारतीय नव्हे.

दारियसच्या लेखातील Hidus भारतीय सिंध मानल्याने कॅमेरॉन (पूर्व उल्लेखित) समोरही एक प्रश्न उभा राहिला. बेहिस्तूनचा शिलालेख ई.स. पूर्व ५३८ मध्ये पूर्ण झाला असे मानले जाते. दारियसने ईजिप्तवरील



स्वारीनंतर नाइल नदीपासून लालसागरा पावेतो एक कालवा काढला; त्याच्या स्मरणार्थ खोदलेल्या लेखांतही दारियसच्या प्रान्तांची यादी आहे. त्या संदर्भात कॅमेरॉन लिहितात-

"Comparison of this list with that of Behistun shows that India -- which since the days of Herodotus (iv-44) has been associated with the digging of the canal --Libya (Putaya) and Kush are the only additions..... omitted are Gandhara and 'those on the sea' both of which occurred at Behistun, as well as 'the lands beyond the sea'...." ['या यादीची बेहिस्तूनच्या यादीशी तुलना दर्शविते की, इंडिया -- जो हेरोडोटसच्या समयापासून या कालव्याच्या खुदाईशी संबद्ध दाखविला आहे -- आणि लिब्या (पुटाया) व कुश हे तीनच देश नवीन जोडले आहेत... गंधार व 'समुद्रतटाचे प्रदेश' जे दोन्ही बेहिस्तूनच्या लेखात आहेत, आणि 'समुद्रपारचे प्रदेश' यांचा उल्लेख वगळला आहे'.]

असे लिहून कॅमेरॉन पुढे म्हणतात, "The absence of Gandhara would be somewhat surprising, for from it started the campaign into India". ['गांधारचा अनुल्लेख काहीसा आश्चर्यकारक आहे, कारण तेथूनच भारतावर स्वारी सुरू झाली होती']. परंतु कॅमेरॉनच्या या आश्चर्याचे कारण ईजिप्तच्या त्या शिलालेखातील Hidus शब्द भारतासाठी आहे या गृहीत धारणेत आहे. ती धारणा दूर सारली, तर त्या लेखात भारताचा उल्लेख आढळणार नाही, आणि मग गंधारचा उल्लेख नसल्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण उरणार नाही. Hidus नाव भारतासाठी नसून, ईजिप्तवरील आक्रमण व त्या कालव्याची रचना बेहिस्तून शिलालेखाच्या (आणि दारियसचा गंधार वर कबजा व पश्चिम भारतावर तथाकथित आक्रमणाच्या) पूर्वी झाली होती. स्वतः कॅमेरॉन म्हणतात की, असे मत प्रायः व्यक्त केले गेले आहे, पण त्यांना ते पटत नव्हते. हेरोडोटसने त्या कालव्याच्या खुदाईशी भारताचा संबंध दाखविला असेल, पण भारत व भारतीय यांबद्दल हेरोडोटसला कशा भ्रामक कल्पना होत्या हे आपण वर पाहिले आहे.

प्रचलित धारणेच्या विरुद्ध असे स्पष्ट संकेत असतानाही झेंद अवेस्ता मध्ये, अथवा दारियसच्या शिलालेखात ईराणी Hidus/Hindus (अथवा तदुद्‌भव एखादा) शब्द आढळताच, तो (संस्कृत सामान्यनाम 'सिंधू'ला अनुरूप) केवळ एक नदी (अथवा समुद्र) या अर्थाचे सामान्य नाम आहे यावर काहीही लक्ष न देता, सरळ भारताच्या 'हिंदू' लोकांकडे दृष्टी वळविण्याचा अनेक विद्वानांना मोह होत आला आहे. या भ्रमाचे एक कारण असे आहे की, संस्कृतमध्ये 'सिंधू' शब्द नदी (अथवा समुद्र) साठी सामान्य नामाशिवाय, पश्चिम भारतातील एका विशिष्ट नदीचे (व तिच्या क्षेत्राचे) एक विशेष नामही आहे. ईराण्यांनी संस्कृतच्या सामान्य 'सिंधू' शब्दाचा 'हिंदू' उच्चार करून, एक नदी या अर्थाने आणि तोही आपल्या भौगोलिक संदर्भात वापरला असून, त्या शब्दाने भारत देशाचे 'हिंदू' संबोधित केले गेले असे म्हणणे सयुक्तिक नाही. आणि तिकडे भारतीयांनी आपल्यासाठी एक अतिरिक्त संबोधन म्हणून 'हिंदू' नाव धारण केले, पण त्याचे शाब्दिक मूळ (वर आणि पुढेही स्पष्ट केल्याप्रमाणे) वेगळेच होते! मात्र, जर स्वतः भारतात 'हिंदू' नाव अशा प्रकारे रूढ झाल्यानंतर ईराण्यांनी भारतीयांना तसे संबोधित केले असेल तर ती उघडच वेगळी गोष्ट होईल.

पर्सेपोलिस शिलालेखांत, त्याचे अनुवाचन बिनचुक यथातथ्य झाले आहे असे मानून, Hidus शब्द येतो, परंतु तो भारतासाठी आहे हे निश्चित नाही; आणि हेरोडोटस Indians चा उल्लेख करतात, तो वस्तुतः भारतीयांसाठी मानला तरी, त्याचा संबंध ईराणी Hidus शब्दाशी आहे हे निश्चित नाही. मात्र वर उल्लेखिलेले लेखक आपल्या उच्चारविषयक भ्रमाच्या व गृहीत धारणेच्या अधीन त्या दोघांत आवश्यक संबंध स्थापन करू चाहतात.[१]

१) याचे आणखी असेच उदाहरण H.G. Rawlinson यांच्या पूर्वउल्लेखित पुस्तकांत (p.17 footnote) आढळेल.



प्रकरण ५

# प्राचीन भारताचे दोन सिंधु प्रदेश

## Chang chen चा Shen-tu देश कोणता?

वॅटर्स म्हणतात (Vol.I.P.132) की, ह्यूएन च्वांग यांनी भारताच्या नांवाची चर्चा करताना उल्लेखिलेला Shen-tu शब्द (ई.स.पूर्व१२३ च्या सुमारास) चीनी राजप्रतिनिधि चांग केन याने प्रथम वापरला होता. अनेक परदेशी भ्रमण करून परतल्यानंतर चांग केन आपल्या सम्राटास दिलेल्या वृत्तांतात म्हणाले की, Ta-bsia (बॅक्ट्रिया अथवा बाल्क) देशांत त्यांना काही लाकडी खांब व कापड आढळले, व त्या वस्तू Shen-tu देशांतल्या होत्या. वॅटर्स म्हणतात की, या Shen-tu देशाचा संबंध चीनी (व युरोपियन) लेखकांनी भारताशी लावला आहे; आणि त्याचे जे वर्णन दिले आहे, त्यावरून त्या देशाच्या जवळ एक विशेष नदी (किंवा समुद्र) असून तेथील लोक लढाईत हत्तींचा विशेष वापर करीत असत.

पण चांग केन व अन्यही चीनी लेखकांनी त्या देशाचे बॅक्ट्रियापासून दक्षिणपूर्व दिशेने (व आणखी काही स्थळांपासून) जे अंतर दिले आहे, ते पाहता तो Shen-tu देश पश्चिम भारतांतील 'सिंधु' देश होऊ शकत नाही. तसेच तो एकूण सारा भारत देश ही म्हटला जाऊ शकत नाही. एकंदर वर्णनाचा विचार करता वॅटर्स अनुमान करतात की, तो देश 'इन्डिया'च्या उत्तर पूर्वेस ब्रह्मदेशाच्या जवळपास असावा. पण त्याला Shen-tu (सिंधु) का म्हटले गेले? वॅटर्स याचा खुलासा करू शकले नाहीत.

आता महाभारताच्या आधारे ते स्पष्ट होत आहे. प्राचीन भारतात 'सिंधु' नामक एकच प्रदेश, व तो पश्चिमेकडे होता अशी सार्वत्रिक धारणा आहे. आणि धृतराष्ट्राचा जावई जयद्रथ त्याचा राजा मानला जातो. पण

महाभारतात भीष्मपर्वाचे प्रारंभी भारतांतील जनपदांची यादी दिली आहे त्यांत 'सिंधु' नावाचे दोन उल्लेख आहेत.

चेदिमत्स्यकरूषाश्च भोजाः सिन्धुपुलिंदकाः ।। ९-४०

काश्मीराः सिन्धुसौवीरा गान्धारा दर्शकास्तथा।। ९-५३

यांतील दुसरे सिन्धु राज्य उघडच काश्मीर, गांधार आदींच्या बाजूचे पश्चिम भारतातील आहे. त्याचा उल्लेख बहुधा सौवीर राज्याबरोबर येतो. पण श्लोक ४० मधील सिंधु राज्य कोणते? आणि जयद्रथ कोणत्या सिंधू राज्याचा अधिपति होता?

### महाभारताचे द्वितीय सिंधू राज्य

महाभारताच्या आश्वमेधिक पर्वामुळे यावर प्रकाश पडतो. कुरुक्षेत्रावरील युद्ध जिंकल्यावर पांडवांनी संपूर्ण भारतावर आधिपत्य स्थापन करण्यासाठी अश्वमेध यज्ञ केला. यज्ञाचा घोडा भारतभ्रमणास निघाला, व त्याच्या रक्षणार्थ अर्जुन सैन्यासह गेला (अध्याय ७३). घोडा राजधानी हस्तिनापुराहून प्रथम उत्तरेकडे वळला; आणि भारताच्या उत्तर पश्चिम टोकाला जाऊन तो पूर्व दिशेकडे वळला (७३-२२,२३). तेथे अर्जुनाने रावी, बियास व सतलज या पंजाबांतील नद्यांच्या खोऱ्यांत बसणाऱ्या त्रिगर्तांचा पराभव केला. घोड्याने पूर्व दिशेच्या रोखाने पुढे जात हिमालयाच्या पायथ्यांशी भारताची संपूर्ण उत्तर सीमा पार केली, व तो प्रत्यक्ष पूर्वीय भारतात आला. येथे तो प्राग्ज्योतिषपुर (वर्तमान आसाम) राज्यांत पोचला. तेथील राजा भगदत्त कुरुक्षेत्रावर युद्धात पांडवांच्या हातून मारला गेला होता. त्याचा पुत्र वज्रदत्त याने आता अर्जुनाचा विरोध केला. त्याने प्रचंड हत्तीवर आरूढ होऊन लढाई केली. हा हत्ती 'नगप्रख्य' (पर्वतासमान) असून, महाभारतकार त्याचे आणखी हे वर्णन देतात-

विक्षरन्तं महामेघं परवारणवारणम्

शास्त्रवत् कल्पितं संख्ये विवशं युद्धदुर्मदम् ।। ७५-१०

"विशाल (काळ्या) मेघासमान भासणारा तो हत्ती मदस्त्राव करीत होता व शत्रूपक्षाचे हत्ती परतवून लावण्यास समर्थ होता; त्याला लढाईचे रीतसर प्रशिक्षण देण्यात आले होते, व तो (माहूताच्या) अधीन राहून युद्धांत



भीषण चाल करून जाणारा होता." मात्र तरीही अर्जुनाने वज्रदत्ताचा पराभव केला.

येथे महत्त्वाची गोष्ट अशी की, तो घोडा तेथून 'सिंधू' राज्यांत शिरला! व तेथे अर्जुनाचे 'सैन्धव' सैन्याशी युद्ध झाले.

सैन्धवैरभवद् युद्धं ततस्तस्य किरीटिना ७७-१

"त्यानन्तर अर्जुनाचे सिन्धु राज्याच्या वीरांशी युद्ध झाले." आणि हे सिंधुराज्य जयद्रथाचे होते हेही महाभारतकारांनी स्पष्ट केले आहे.

तं स्मरन्तो वधं वीराः सिन्धुराजस्य चाहवे

जयद्रथस्य कौरव्य समरे सव्यसाचिना ।। ७७-११

"कुरुनन्दना (जनमेजया), (कुरुक्षेत्रावरील) युद्धात अर्जुनाने रणभूमीवर सिंधुराज जयद्रथाचा केलेला वध स्मरणारे ते (सिंधु राज्याचे) वीर" (अर्जुनावर बाणवृष्टि करून लागले). त्यांत जयद्रथाचे पुत्रही होते; अर्जुन त्यांना धराशाही करू लागला, तेव्हा जयद्रथाची विधवा पत्नी दुःशला आपला नातू बरोबर घेऊन रणांगणावर आली व अर्जूनासमोर अश्रू ढाळू लागली. अर्जुनाने तिचे सांत्वन करून लढणे थांबविले.

तेथून घोडा मणिपूरला आला.

क्रमेण स हयस्त्वेवं विचरन् पुरुषर्षभ

मणिपूरपतेर्देशमुपायात् सह पाण्डवः ।। ७८-४९

" पुरुषश्रेष्ठा (जनमजेया), अशा क्रमाने पुढे जात तो घोडा अर्जुनासह मणिपुरनरेशाच्या राज्यांत आला". मणिपुर आसामच्या जवळपास आहे. तेथून घोडा मगधाकडे व नंतर दक्षिण भारताकडे वळला.

यावरून स्पष्ट होईल की,जयद्रथाचे सिंधु राज्य भारताच्या उत्तरपूर्व भागात, प्राग्ज्योतिषपुर व मणिपुर यांच्या जवळपास, ब्रह्मदेशच्या सीमेजवळ, होते. अशा प्रकारे वॅटर्स यांनी केलेले अनुमान बरोबर ठरते! तेथे प्रचंड लढाऊ हत्ती युद्धासाठी प्रशिक्षित केले जात असत; विशाल ब्रह्मपुत्रा नदी वाहत जाते; आणि पर्वतीय जंगलातून चांगले इमारती लाकूड उपलब्ध होते. अशा रीतीने पूर्व भारतातील या दुसऱ्या सिंधु प्रदेशाबाबत महाभारत चीनी साहित्याची पुष्टि करते.

पण यासंबंधात वनपर्वातील काही श्लोकांवरही विचार इष्ट आहे. आपल्या वनवासकालांत पाण्डव काम्यक वनात असतां, एक दिवस द्रौपदीस पर्णकुटीवर ठेवून पांडव वनात गेले. त्यावेळी जयद्रथ मोठ्या लवाजम्यासह तिकडून जात होता. पर्णकुटीत द्रौपदी एकटी पाहून तो तिच्याजवळ गेला, व थोड्याशा संभाषणानंतर त्याने तिचे अपहरण केले. पण लवकरच पाण्डव वनांतून परत आले, व जयद्रथाचा पाठलाग करून त्यांनी द्रौपदीला मुक्त केले. (वनपर्व अध्याय २६४ ते २७२).

या प्रसंगाच्या वर्णनात जयद्रथाला 'सिंधूनां राजा' (२६४-६,११), इतकेच नव्हे तर 'सौवीरराज' (२६५-१२) आणि "पतिः सौवीरसिंधूनां" (२६७-८) असेही म्हटले आहे. हे सौवीर पश्चिम भारतात होते यांत शंका नाही. मग त्या सौवीर बरोबर उल्लेखिलेले जयद्रथाचे सिंधु राज्यही पश्चिम भारतात होते काय ? सौवीरच्या त्या उल्लेखामुळे अनेकांची अशी धारणा झाली आहे. पण मग आश्वमेधिक पर्वांत जयद्रथाचे सिंधु राज्य पूर्व भारतात दाखविले आहे हे कसे?

महाभारतकारांनी याचा उलगडा एका सूक्ष्म संकेताद्वारे केला आहे. जयद्रथ द्रौपदीजवळ गेल्यावर त्याने प्रथम आपला दुष्ट हेतु व्यक्त न करता तिचा कुशल समाचार विचारला; आणि त्यावर तीही शिष्टाचारपूर्वक त्याला म्हणाली--

अपि ते कुशलं राजन् राष्ट्रे कोषे बले तथा।।२६७-१०
कच्चिदेकः शिबीनाढ्यान् सौवीरान् सहसिन्धुभिः
अनुतिष्ठसि धर्मेण ये चान्ये विजितास्त्वया।।११

"राजा, तू राज्य, कोष व सैन्य या बाबतीत सुखी आहेस ना? तू जिंकलेले सिंधुसह सौवीर, शिबी व अन्यही समृद्ध प्रदेश यांचे शासन तू निश्चिंतपणे व धर्मानुकूल करतोस ना?" येथे श्लोक १० मध्ये जयद्रथाच्या एकूण राज्यवैभवाबद्दल व्यापक प्रश्न आहे. पण श्लोक ११ मध्ये निर्दिष्ट राज्ये पश्चिम भारतात असून ती त्याने "जिंकून घेतलेली होती" (त्वया विजिताः). ती जिंकण्यात त्याला त्याचा शालक दुर्योधनाचे -- जो पूर्वपश्चिम भारताच्या मध्यस्थित हस्तिनापुरचा सम्राट होता-- साह्य झाले असेल. मात्र नन्तर



जयद्रथाचा कुरुक्षेत्रावरील युद्धात वध झाल्यावर, त्याची विधवा पत्नी दुःशला साहजिकच पूर्वेकडील आपल्या आनुवंशिक मूळ सिंधु राज्यांत राहू लागली. व म्हणून तेथे अश्वमेध यज्ञाच्या घोड्याच्या मागोमाग येणारा अर्जुन तिला भेटला.

जयद्रथाने पश्चिमेकडील सिंधुसौवीर राज्ये केव्हा जिंकली असावी याचाही अंदाज महाभारतावरून लागतो. महाभारतात जयद्रथाचा सुरवातीचा एक उल्लेख पुढील श्लोकात येतो. धृतराष्ट्राचे सर्व पुत्र व कन्या दुःशला यांची नावे सांगून वैशंपायनाने म्हटले की, धृतराष्ट्राने आपल्या सर्व पुत्रांचे विवाह अनुरुप स्त्रियांशी करून दिले, आणि--

दुःशला समये राजन् सिन्धुराजाय कौरवः ।। आदिपर्व ६७-१०९
जयद्रथाय प्रददौ सौबलानुमते तदा... ।। ११०

"राजा (जनमेजया), कुरूराजाने उचितसमयी शकुनीच्या सल्यास अनुसरून दुःशलेचा सिंधुराज जयद्रथाशी विवाह करून दिला." यांत सौवीरचा उल्लेख नसून जयद्रथाला केवळ 'सिन्धुराजा' म्हटले आहे. हेच पुनः आदिपर्व अध्याय ११६ श्लोक १७,१८ मध्ये सांगितले असून, द्रौपदीस्वयंवरात एकत्रित राजांचा द्रौपदीस परिचय करून देत असतानाही धृष्टद्युम्न म्हणतो--

भागीरथो बृहत्क्षत्रः सैन्धवश्च जयद्रथः
बृहद्रथो बाल्हिकश्च श्रुतायुश्च महारथः ।। आदिपर्व १८५-२१

येथपावेतो जयद्रथ पश्चिमेकडील सिंधुसौवीर राज्यांचा अधिपति नसून, केवळ पूर्वेकडील आपल्या आनुवंशिक सिंधु राज्याचा स्वामी होता, हे पुढील श्लोकावरूनही स्पष्ट होईल.

इन्द्रप्रस्थास युधिष्ठराने राजसूय यज्ञ केला तेथे जयद्रथही अर्थातच आमंत्रित होता. सर्व अतिथि आदींची नावे सांगताना हे स्पष्ट म्हटले आहे-

सोमदत्तोऽथ कौरव्यो भूरिर्भूरिश्रवा शलः
अश्वत्थामा कृपो द्रोणः सैन्धवश्च जयद्रथः ।। सभापर्व ३४-८

यांतही सौवीरचा उल्लेख नसून, जयद्रथाला केवळ सैन्धव (सिन्धुराजा)

म्हटले आहे. हे सिंधु राज्य पूर्व भारतातील जयद्रथाचे आनुवंशिक सिन्धु राज्य असून, पश्चिम भारतातील सौवीरजवळचे नव्हते, हे त्या राजसूय यज्ञाच्या आणखी वर्णनावरूनही दिसून येते. त्या यज्ञात पांडवांचे अपार वैभव पाहून दुर्योधनास घोर मत्सर झाला व त्याने धृतराष्ट्राला आपल्या मनाचे शल्य व्यक्त करीत युधिष्ठिरास अनेकानेक राजांनी कशा प्रचंड भेटी नम्रपणे अर्पण केल्या हे विस्ताराने (पण अर्थातच अतिशय दुःखाने) वर्णन केले. त्यांत अन्य अनेक राजांच्या नजराण्यांचा उल्लेख केल्यावर दुर्योधन म्हणतो-- (सभापर्व अध्याय ५१)

सैन्धवानां सहस्त्राणि हयानां पञ्चविंशतिम्
अददात् सैन्धवो राजा हेममाल्यैरलंकृतान्।।
सौवीरो हस्तिभिर्युक्तान् रथांश्च त्रिशतावरान्।

"सिन्धुराजाने सुवर्णमालांनी अलंकृत २५ हजार सिन्धुदेशी घोडे भेट केले; सौवीर राजाने हत्ती जोतलेले, आणि सोने, मणी व रत्नांनी सजविलेले तीनशे रथ दिले." येथे सिन्धुराज्याला लागून सौवीरचा वेगळा उल्लेख असून, युधिष्ठिरास ही प्रचंड भेट देणारा हा सिन्धुराजा दुर्योधनाचा मेहुणा जयद्रथ असणे संभव नाही; आणि पूर्ण सुसंगतपणे महाभारतकाराने येथे 'सैन्धवो राजा' म्हणताना जयद्रथाचा उल्लेख टाळलाही आहे. याचा आशय असा की, पश्चिमेकडील सौवीर प्रदेशाला लागून असलेल्या सिंधुप्रदेशाचा राजा या समयापावेतो जयद्रथ नसून अन्य कोणी होता, व जयद्रथ केवळ पूर्वेकडील सिंधुराज्याचा अधिपति होता.

महाभारताच्या काही पोथ्यात (सभापर्व अध्याय ५१ मधील उद्धृत) या तीन पंक्ती दिल्या जात नाहीत. पण या प्रसंगी सम्राट युधिष्ठिराला प्राप्त अपरिमित भेटींच्या विस्तृत वर्णनात त्या पूर्ण सुसंगत आहेत. असे दिसते की, यांत निर्दिष्ट सिंधुराजा म्हणजे दुर्योधनाचा मेहुणा जयद्रथच होय अशी भ्रामक कल्पना करून व त्याने पांडवांना अशी भेट अर्पण करणे असंभव पाहून, आणि याशिवाय जयद्रथ प्रारंभापासूनच पश्चिमेकडील सिंधु व सौवीर या दोहोंचा राजा होता अशी भ्रामक कल्पना करून व या पंक्तीत सिंधु व सौवीरचे राजे भिन्न दाखविले आहेत ते चूक मानून, उक्त



पंक्ती त्या पोथ्यांत गाळल्या गेल्या असाव्या. परंतु यात निर्दिष्ट सिंधुराजा म्हणजे जयद्रथ नव्हे हे ध्यानात घेतले, म्हणजे या पश्चिमेकडील तत्समयीच्या सिंधुराजाने युधिष्ठिराला अशी भेट देणे पूर्ण संभव व स्वाभाविक होते, आणि सौवीरचा राजा त्या सिंधुराजाहून वेगळा होता, हेही लक्षात येईल; व या पंक्तींना अनधिकृत मानण्याचे कारण उरणार नाही.[१]

या राजसूय यज्ञानंतर लवकरच हस्तिनापूरला द्यूत होऊन पांडवांचा दीर्घ वनवास प्रारंभ झाला. असे दिसते की, त्या कालात दुर्योधनाचा एकछत्र प्रभाव सर्वत्र पसरून त्याच्या सहाय्याने जयद्रथाने पश्चिमेकडील सिंधु सौवीर राज्ये जिंकून घेतली, व आता तो उभय सिंधुप्रदेशांचा एकमेव 'सिन्धु राजा' झाला. आणि वर सांगितल्याप्रमाणे तो मोठ्या लवाजम्यासह त्या दिशेने जात असता, त्याने द्रौपदीचे अपहरण करण्याचा प्रयास केला. त्या प्रसंगाच्या वर्णनात जयद्रथाला 'सिंधूनां' राजा व शिवाय 'सौवीरराज' म्हटले असून ते उचितच आहे.

**जयद्रथाच्या मूळ सिंधु राज्याविषयी भ्रम**

वनपर्वातील त्या वृत्तांतांत जयद्रथाला उद्देशून 'सिंधु' बरोबर 'सौवीर'चा उल्लेख पाहून, (द्रौपदीच्या 'त्वया विजिताः,' शब्दांवर लक्ष न देता), असा भ्रम प्रचलित झाला आहे की, जयद्रथाचे मूळ सिंधु राज्य पश्चिम भारतातच होते. पुणेच्या भांडारकर संस्थेद्वारा प्रकाशित आश्वमेधिक पर्वाचे संपादक याच भ्रमामुळे अशी कल्पनाही करतात की, अश्वमेधाचा तो घोडा पूर्वीय भारतांतील प्राग्ज्योतिषपुरहून एकदम शेकडो कोस दूर पश्चिम भारतात जयद्रथाच्या सिंधू राज्यात आला, आणि लागलीच ते प्रदीर्घ अंतर पुनः उलट दिशेने पार करून परत पूर्वेस मणिपुरला आला, (व तेथून मगधास जाऊन दक्षिणेकडे वळला). आणि या कल्पनेच्या आधारे त्या संपादकांनी महाभारतकारांना घोड्याचे असे असंभव प्रयाण वर्णन केल्याबद्दल हळूच दोषही देऊन टाकला आहे!

१) मात्र, त्या पंक्ती बाजूस सारल्या तरी प्रस्तुत मुख्य विवेचनास बाधा पोचणार नाही. वनपर्वातील उद्धरणात जयद्रथाला अनुलक्षून सिंधूबरोबर सौवीरचा उल्लेख येण्यापूर्वी महाभारतात तसा उल्लेख नाही; आणि वनपर्वातील उल्लेखांत 'त्वया विजिताः' असे म्हटले आहे.

"Then the horse entered the Saindhava country. It is a long long way from Pragjyotisa (the Easternmost part) to the Sindhu region in the west. One would have expected the itinerary of the horse to be described more rationally, but as the horse was to be allowed to move freely there is no room for any objection." ['नंतर तो घोडा सैंधव प्रदेशात शिरला. प्राग्जोतिष (पूर्वेकडील अंतिम प्रदेश) पासून पश्चिमेतील सिंधू प्रदेशापावेतोचा मार्ग फार फार अंतराचा आहे. घोड्याचे भ्रमण अधिक सयुक्तिक वर्णन करावयास हवें होतें अशी आपली अपेक्षा असू शकते, परंतु घोड्याला स्वतंत्रपणे भ्रमण करण्याची मुभा द्यावयाची होती म्हणून अशी काहीही आपत्ती घेण्यास जागा नाही.'] पण वस्तुतः ही टीका निराधार आहे; कारण जयद्रथाचे मूळ सिंधुराज्य पूर्वेकडेच प्राग्ज्योतिषपुरजवळ होते.

त्या पूर्वीय प्रदेशालाही 'सिंधु' नांव का पडले असावे? एक संभाव्य कारण असे दिसते की, हिमालयात ब्रह्मपुत्रा नदीचा उगम सिन्धु नदीच्या उगमाच्या जवळपास होतो. बहुधा यामुळे प्राचीन काळी असा एक समज होता की, ब्रह्मपुत्रा नदी सिंधूची एक शाखा आहे. (सावरकरांनी याचा उल्लेख केला आहे. पु.उ. P.20). म्हणून ब्रह्मपुत्रा नदीच्या प्रदेशालाही 'सिन्धु' संबोधित केले जात असेल; मात्र या दोन नद्या भिन्न असल्याचे कालान्तराने ज्ञात झाले असले पाहिजे. पण कारण काहीही असो; प्राचीन भारतात 'सिंधु' नामक दोन भिन्न प्रदेश होते हे खरे;[१] आणि याची पुष्टि भीष्मपर्वातील वर उद्धृत श्लोकांवरूनही होते.



१) अशाच प्रकारे माळवा नांवाचेही एकाहून अधिक प्रदेश होते, व त्यामुळे कधी कधी घोटाळा होतो; पाहा "Harsa and his Times", by Dr.Baijnath Sharma, P.140.



प्रकरण ६

# 'इंदु' पासून हिंदू (आणि इंडो-इंडिया)

## ई-चिंग (I-Tsing/ I-Ching) चा वृत्तांत

च्वांगच्या कथनाची चर्चा करताना वॅटर्स (वर उद्धृत) एक अन्य चीनी प्रवासी ई-चिंगचा तुलनात्मक उल्लेख करतात. ई-चिंगने ईसवी सातव्या शतकात च्वांगच्या काही थोड्या समयानंतर भारतयात्रा केली होती. त्यांच्या प्रवासवर्णनाचे J.Takakusu ने केलेले इंग्रजी भाषांतर "A Record of the Buddhist religion as practised in India and the Malay Archipelago by I-Tsing" (Clarendon Press, Oxford, 1896) या शीर्षकाने उपलब्ध आहे.

ई-चिंग भारताला The West (Si-fang) म्हणतात; आणि लिहितात की याची अनेक नावे आहेत, त्यांत एक 'आर्य देश' (A-li-ya-ti-sha) असून ते त्याचे हे स्पष्टीकरण देतात.

"Arya means 'noble', desa 'region', the Noble Region, a name for the West. It is so called because men of noble character appear there successively, and people all praise the land by that name". (उक्त P.118) ["'आर्य' म्हणजे 'noble' (श्रेष्ठ, महान) देश म्हणजे 'region', आर्य देश (Noble Region), पश्चिम प्रदेशासाठी एक नाव. त्याला हे नाव यासाठी दिले जाते की, तेथे श्रेष्ठ चारित्र्याच्या व्यक्ती लागोपाठ होत असतात, आणि सर्व लोक त्या देशाची या नावाद्वारे प्रशंसा करीत असतात."] ई चिंग आणखी म्हणतात, "The northern tribes (HU=Mongols or Turks) alone call the Noble Land 'Hindu', but this is not at all a common name. It is only a vernacular name, and has

no special significance. The people of India do not often know this designation, and the most suitable name for India is the 'Noble Land'. Some say that Indu means the moon, and the Chinese name for India, i.e. Indu, is derived from it; although it may mean this, it is, nevertheless, not the common name". [केवळ उत्तरीय टोळ्या (हू = मंगोल अथवा तुर्क) या आर्यदेशाला 'हिंदू' म्हणतात, पण हे प्रचलित नाव मुळीच नाही. ते केवळ एक स्थानिक भाषेतील नाव असून त्याला विशेष महत्त्व नाही. इंडियाच्या लोकांना हे नाव बहुधा माहीत नसते. काही जण म्हणतात की, 'इंदु'चा अर्थ चन्द्र आहे, आणि इंडियासाठी चीनी नाव 'इंदु' त्या शब्दापासून तयार झाले आहे; त्याचा असा अर्थ असला तरी ते प्रचलित नांव नाही.]

ई चिंग भारताची आर्य, हिंदू व इंदू अशी तीन नावे देतात. परंतु 'या देशात श्रेष्ठ व्यक्ति सतत निर्माण होत असतात' याचा संबंध ते 'आर्य' नावांशी लावतात. तर च्वांग तो 'इंदु'शी दाखवतात.

ई चिंगला 'हिंदू'ची 'इंदु'पासून व्युत्पत्ती माहीत झाली नसेल, म्हणून ते म्हणतात की,'हिंदू' संबोधनात काही विशेष आशय नाही. याशिवाय, केवळ 'उत्तरीय जाती' त्या संबोधनाचा प्रयोग करतात असे ते म्हणतात, तेव्हा ते कोणते लोक दिग्दर्शित करतात हे स्पष्ट नाही.

ई-चिंग यांच्या मूळ चीनी लेखाचे वर उद्धृत इंग्रजी भाषांतर कितपत तंतोतंत बरोबर आहे हे पहावे लागेल. पण त्या भाषांतरानुसारही ई चिंग चे म्हणणे असे होते की, भारतीय लोक 'हिंदू' शब्दाचा उपयोग वारंवार (often) करीत नाहीत. अर्थात ते संबोधन भारताच्या जनतेत काही थोड्या प्रमाणात प्रचलित असलेले त्याना आढळून आले. परंतु त्यांच्या लिखाणाचा इंग्रजी भाषांतरकार आपल्या General Introduction मध्ये तो often शब्द गाळून ई-चिंग ला असे म्हणताना उद्धृत करतो की, "The people of India themselves do not know it" (the name 'Hindu') ['स्वतः भारताचे लोक ते-- म्हणजे 'हिंदू' नांव -- जाणत



नाहीत']. नेहरू देखील ई-चिंगला अशाच चुकीच्या प्रकारे उद्धृत करतात. (पु.उ. P.190); वस्तुतः नेहरूंच्याच अनुसार (वर उद्धृत) सुमारे एक शतकानंतर 'हिंदू' नावाला एका संस्कृत रचनेत स्थान प्राप्त झाले होते. आणि याशिवाय ई-चिंगच्या त्या (often सहित) कथनावरही विचार करताना हे ध्यानात घेतले पाहिजे की, (त्यांच्या भाषांतरकाराच्या अनुसार) "The places which he says definitely he visited were very few." म्हणून एकूण भारतीय जनतेविषयी त्यांचे व्यापक विधान फारसे विश्वसनीय होऊ शकत नाही.

ई-चिंग काही स्पष्टपणे चुकीची माहिती देखील देतात. ते म्हणतात की, तिबेट मध्ये बुद्धधर्माचा प्रसार झाला नव्हता (उक्त P198). परंतु त्यांच्या अनुवादकाच्या टीपेनुसार ई-चिंगच्या पूर्वी च्वांगच्या समयीही तिबेटांत बुद्धधर्म पोचला होता. अशाच प्रकारे, ई-चिंग 'आर्यदेश' (भारत) च्या संदर्भात म्हणतात की, त्याला 'मध्यदेश' असेही म्हणतात, कारण तो शेकडो देशांच्या मध्ये आहे (P.110). परंतु (ईसवी पाचव्या शतकांत भारतात येणाऱ्या) एका अन्य चीनी प्रवासी फा-हैन ने उचितच म्हटले आहे की,[१] मध्यदेश (पाली भाषेत 'मज्जिम देश') नांव मथुरेच्या दक्षिणेकडील मध्यभारत क्षेत्रासाठी होते.

याशिवाय असे की, ई-चिंगचा इंग्रजी अनुवादक स्वतःच भारताच्या 'हिंदू' नांवाविषयी प्रचलित धारणेच्या अधीन लिहितो की, "Hindu in Persian and Indo in Greek were perhaps corrupted from Sindhu"; परंतु ई-चिंग स्वतः असे काहीही म्हणत नाही. तसेच, भारताचे चीनी नाव T'ien-chu 'इंदु' पासून तयार झाले आहे असे च्वांग (ज्यूलियन यांनी स्पष्ट केल्याप्रमाणे) म्हणत असतां, ई-चिंगचा हा भाषांतरकार General Introduction मधे म्हणतो की, तो चीनी शब्द देखील 'सिंधू' पासून

१) "A record of Buddhist Kingdoms (Being an Account by the Chinese Monk Fa-Hien of his Travels in India and Ceylon)", translated and annotated by James Legge, P. 42.

झालेला आहे.[१] मात्र फा-हैनने भारताला T'een (Thien)-chu संबोधित केले असून, त्यांच्या भाषांतरकारानुसार तो शब्द 'सिंधू' पासून भिन्न आहे. (पू.उ.P.54)

पण ते काहीही असो. विशेष मुद्दा असा की, ई चिंग जाणत होते की, भारताचे एक नांव चन्द्रवाचक 'इंदु' शब्दाशी संबद्ध असून, भारताच्या एका नांवाचा संबंध येथे जन्म घेणाऱ्या महान व्यक्तींच्या सतत परंपरेशी आहे, आणि हेही की ई-चिंग 'हिंदू'चा संबंध 'सिंधू'शी दाखवीत नाही.

### काही भारतीय विद्वानांचे प्रतिपादन

आतापावेतो स्पष्ट केल्याप्रमाणे भारताच्या प्राचीन चीनी नावाच्या मुळात (रात्रिकालीन आकाशात सर्वश्रेष्ठ प्रकाशस्त्रोत) चन्द्र या अर्थाचा संस्कृत शब्द 'इंदु' होता. ह्युएन च्वांग 'इंदु' नावाविषयी हे आणखी स्पष्टीकरण देतात की, या देशाचा उत्तर भाग रुंद व दक्षिण भाग अरुंद असल्याने याचा एकूण आकार अर्धचन्द्ररूप आहे. चीनी विद्वानांना ही माहिती भारतात उपलब्ध झाली असली पाहिजे. भारताच्या त्या आकाराचा उल्लेख 'जंबुदीवपण्णत्ति' या जैन ग्रंथातही आढळतो.[२] जवाहरलाल नेहरू "Letters from a Father to his Daughter" या पुस्तकात म्हणतात की, आर्यावर्त (भारत) देशाला त्याच्या crescent moon समान आकारामुळे 'चन्द्राचा ('इंदु'चा ) देश' म्हणत असत. परन्तु नेहरू त्या सन्दर्भात ह्यूएन च्वांगचा, आणि च्वांगनी 'इंदू'च्या दिलेल्या सर्वश्रेष्ठ अर्थाचाही, उल्लेख करीत नाहीत. वस्तुतः (वर उद्धृत केल्याप्रमाणे) नेहरूंची मूळ धारणा ही आहे की, 'हिंदु' नांवाचा उगम 'सिंधु'च्या ईराणी उच्चारांत आहे.

सावरकर (पू.उ.P.10) च्वांगचा उल्लेख करून म्हणतात, "Even Huen-t-Sung who lived so long with us persists in calling us शिन्तु or हिन्तु." पण च्वांग भारतीयांना शिन्तु (सिंधु) किंवा हिन्तु म्हणण्याचा

१) यामुळे, भारताच्या नांवाविषयी ई-चिंगच्या मूळ वाक्याचे वर उद्धृत भाषांतरही चीनी शब्दांनुरूप आहे किंवा नाही याची शंका होते.

२) पाहा "India as described in early texts of Buddhism and Jainism," by Bimala Churn Law (PP.12-13).



आग्रह धरत नाहीत; त्यांचा आग्रह, वर दाखविल्याप्रमाणे,'इंदु' या मूळ नांवावर आहे; आणि त्यापासून 'हिंदू' शब्द झाला. या उलट, सावरकर म्हणतात की, 'इंदु' हा च्वांगनी 'हिंदू' नावाला दिलेला एक नवा मजेदार आशय आहे.

> "No Hindu can help feeling proud of himself at the curious interpretation put upon this epithet by the illustrious traveller Yuan Chwang ....when he identifies our national name 'हिंदु' with the Sanskrit 'इन्दु' and says in justificaiton that the world had rightly called this nation 'इन्दूS' for they and their civilization had like the moon ever been a constant source of delight and refreshment to the languid and weary soul of man" (पू.उ.P.49)" ['सुप्रसिद्ध प्रवासी युअन च्वांग ने या शब्दाला लावलेल्या मजेदार स्पष्टीकरणाने कोणाही हिंदूला स्वतःविषयी गर्व वाटल्याशिवाय राहणार नाही... च्वांग आमच्या राष्ट्रीय संबोधन 'हिंदू'त संस्कृत 'इंदु' शब्द पाहतात, आणि त्याच्या समर्थनार्थ म्हणतात की, जगाने या राष्ट्राला उचितच 'इंदु' म्हटले होते, कारण त्याचे लोक व त्यांची संस्कृती मानवाच्या उदास व त्रस्त हृदयाला सदैव प्रसन्नता व उत्साह प्रदान करणारा चन्द्रासमान एक स्त्रोत होता'].

परन्तु च्वांगचा आशय बाह्य जगाने या देशाला 'इन्दु' संबोधित केले हा नसून, ते नांव स्वतः भारतीयांनीच धारण केले असा आहे. 'इन्दु' हा च्वांग ने 'हिन्दु' शब्दाला दिलेला एक मजेदार नवा अर्थ नाही. भारतीयांचा 'हिन्दू' शब्द मूलतः 'सिन्धू'पासून झाला ही कल्पना सावरकरांच्याही मनात दृढमूल झाली नसती, तर देशभक्तीने ओतप्रोत त्यांच्या मनाने 'इंदु' हे विदेशियांनी दिलेले स्पष्टीकरण म्हटले नसते, आणि 'हिन्दु' नावासाठी प्राचीन ईराणी लोकांचा व्यर्थ (व अपमानजनक) आधार घेतला नसता.

पु. ना. ओक 'हिन्दु' शब्दाच्या विवेचनात हुएन च्वांगचा उल्लेख

करून म्हणतात, "हिन्दु हा शब्द सिंधुचा अपभ्रंश नसून इन्दु शब्दाचा असावा अशीही शक्यता आहे. कारण त्या इन्दु नावाचा युरोपीय अपभ्रंश India असा झालेला दिसतो." ("हिंदु विश्वराष्ट्राचा इतिहास," पृ. ६). हे विधान अन्य अनेकांच्या विधानांपेक्षा यथार्थ आहे. पण यानंतर ओक पुढे म्हणतात, "हुएत्संग ह्या चीनी यात्रेकरूने लिहिले आहे की, (भारत देश) तिअन-चू ची नावे बरीच आहेत. प्रथम भारतास शिंतु व हिअनऊ तशी नावे होती. पणं शुद्ध उच्चार केला तर ते नांव खरे इनतु असे असायला हवे. इन्तु देशाचे लोक स्वतःच्या देशाचा अनेक प्रकारे उल्लेख करतात. चीनी भाषेत चन्द्राची अनेक नावे आहेत त्यापैकी इन्तु हे एक नाव आहे. ते चांगले नाव आहे... " (पृ.७). ओकांनी हे Beal कृत भाषांतराच्या आधारे लिहिले आहे. पण 'इन्दु' शब्द चीनी नाही, व च्वांगचेही तसे म्हणणे नाही. आणि आपल्या त्याच पुस्तकात जगांतील अन्य अनेक भाषांतील कित्येक शब्द मुळांत संस्कृत आहेत असे आग्रहपूर्वक प्रतिपादन करीत असतां, ओक भारताच्या नांवाशीच संबद्ध या संस्कृत 'इंदु' शब्दाला चीनी भाषिक स्वीकारण्यास तयार होतात हे आश्चर्य होय! तो शब्द मुळात चीनी मानून 'हिन्दु' हा त्याचा अपभ्रंश मानला तर आमचे 'हिंदु' नाव पुनः मूलतः परकीय ठरेल.

सावरकरांप्रमाणे ओकांचाही मुख्य रोख भारतावरील इस्लामी आक्रमकांविरुद्ध असून, इस्लामपूर्व इराणियांनी (अथवा चीनी लोकांनीही) भारताला हिंदु नाव दिले या धारणेत त्यांना विशेष आपत्ती दिसत नाही. किंबहुना, 'हिंदू' नाव भारतीयांवर इस्लामी आक्रमकांनी थोपले या धारणेचा तीव्र विरोध करताना हे लेखक ते नांव इस्लामपूर्व ईराण्यांनी दिले होते या कल्पनेचा आधार घेऊ चाहतात. म्हणून या कल्पनेला अनुकूल काही तर्क देत ओक म्हणतात,"अरबी व इराणी लोक हे हिंदु शब्द नेहमी निंदात्मकच वापरीत हे म्हणणेही बरोबर नाही. हिंदू ह्या नावाचा ते आदराने उल्लेख करीत... भारताबद्दलचा विद्वेष अरब व इराण देशांत इस्लाम धर्म प्रसारानन्तर निर्माण करण्यात आला" (पृ.३). पण इस्लामपूर्व ईराणी लेखांतील 'हप्तहिंदु' व 'हिंदुश'या दोन शब्दांची चर्चा आपण वर



केली आहे. त्या शब्दांचा संबंध भारताशी लावावयचा असेल, तर हेही ध्यानात घेतले पाहिजे की, 'हप्तहिंदू' द्वारा या देशातील महिलात एक गंभीर विकृति सूचित असून, 'हिन्दुश' शब्दात एका विदेशी सत्तेने केलेले सैनिक आक्रमण दिग्दर्शित आहे. त्या काळातील इराणी व भारतीय यांच्या आपसातील संबंधाविषयी लिहिताना, एक लेखक Incompatibility (परस्पर सुसंगतित्वाचा अभाव), इतकेच नव्हे तर mutual hostility (परस्पर शत्रुता) असाही उल्लेख करतात.[1]

ही गोष्ट वेगळी की, ईराणमध्ये इस्लामचा प्रचार झाल्यावर, तेथील ज्या मूळ रहिवाशांनी धर्मान्तर अथवा घोर यातना यातून वाचण्यासाठी देशत्यागाचा मार्ग स्वीकारला, त्यांना भारतीयांनी पूर्व वैमनस्यभाव विसरून उदारतापूर्वक आश्रय दिला. 'झेंद अवेस्ता'चे इंग्रजी भाषांतरकार James Darmesterer त्या ईराण्यांविषयी लिहितात,

> "May of those who clung to the faith of their fathers, went and sought abroad for a new home, where they might freely worship their old gods, say their old prayers, and perform their old rites. That home they found at last among the tolerant Hindus, on the western coast of India." (Sacred Books of the East, Vol IV, Introduction, P. xi). ['आपल्या पैतृक धर्माला चिकटून राहणाऱ्यांपैकी अनेक, जेथे ते आपल्या परंपरागत देवतांचे मुक्तपणे पूजन करू शकतील, आपल्या पुरातन प्रार्थना म्हणू शकतील, आपले जुंने धार्मिक विधि पाळू शकतील असे एखादे नवे वसतिस्थान देशाबाहेर शोधू लागले. सरतेशेवटी त्यांना ते वसतिस्थान भारतवर्षाच्या पश्चिम समुद्र किनाऱ्यावर धर्मसहिष्णु हिन्दूंत आढळून आले.']

भारताला 'हिंदू' नाव ईराण्यांनी दिले या कल्पनेच्या समर्थनार्थ

१) "History and culture of the Indian people" vol.I, P.223. महाभारतात 'पारसिकां'ना यवन, हूण, म्लेच्छ आदि म्हटले आहे (भीष्मपर्व ९-६५,६६); आणि अलबेरूनी (पुढे उद्धृत) भारतीय व इस्लामपूर्व ईराणी यांत मित्रतेचा अभाव दर्शवितात.

ओक आणखी एक असा तर्क देतात-

"एखाद्या देशाला दोन व अधिक नावे असणे, व त्यांतले एक इतरांनी ठेवलेले असणे यांत गैर, विचित्र वा जगाविरहित असे काहीच नाही. बहुतेक देशांना विविध नावे इतिहासाच्या ओघात पडतातच. उदा. ईजिप्तचे दुसरे नाव मिश्र आहे. जपान देशाचे लोक स्वतःच्या देशाला निपॉन म्हणतात. जर्मनीचे लोक स्वतःच्या देशाला डॉइटस्लँड म्हणतात... अशी कितीतरी उदाहरणे देता येतील" (पूर्वोक्त पृ.१).

या तर्कांत एक स्पष्ट हेत्वाभास आहे. काही देशांना परकीयांनी दिलेली नावे आंतरराष्ट्रीय व्यवहारात रूढ झाली, तरी ती त्या देशांच्या-- विशेषतः सुसंस्कृत देशांच्या --- अंतर्गत वापरली जात नाहीत. ओकांनी स्वतः दिलेली उदाहरणे या दृष्टीने पारखून घ्यावी. अलीकडील काळात आफ्रिकेतील व अन्यत्रही ज्या देशांना विदेशियांनी नावे दिली होती त्यांनी स्वतंत्रता प्राप्त केल्यावर आपली स्वतःची नावे परराष्ट्रीय व्यवहारांतही रूढ केली आहेत. परंतु 'हिन्दू' नांव हा देश पूर्ण स्वातंत्र्याच्या व श्रेष्ठ विकसित सांस्कृतिक अवस्थेत होता तेव्हापासून स्वतः भारतीय जनतेत प्रचलित आहे, आणि तेही अतिशय आस्थेने.

अशाच प्रकारे राजवाडे देखील म्हणतात-

"भारतवर्षातील लोक फार पुरातन कालापासून आपल्या स्वतःला आर्य या नावाने ओळखतात. अर्थात हिंदू हे नाव भारतीय आर्यांना परकीय लोकांनी दिलेले आहे. असा प्रकार इतर अनेक लोकांच्या नावांचा झालेला आढळतो. उदाहरणार्थ, ज्यांना सध्याचे युरोपियन लोक ग्रीक म्हणतात ते लोक आपल्या स्वतःला Hellenes व आपल्या देशाला Hellas हेलास म्हणतात. Hellenes लोकांना रोमन लोकांनी ग्रीक हे नाव दिले, का तर Hellenes लोकांतील (Graian) नावांची एक क्षुद्र जात रोमन लोकांच्या प्रथम परिचयाची झाली. ज्या लोकांना इंग्लिश लोक जर्मन म्हणतात व ज्यांच्या देशाला जर्मनी म्हणतात किंवा फ्रेंच लोक Allemanyue आलेमान्य म्हणतात ते लोक स्वतः आपल्या देशाला Deutochland म्हणतात.



म्हणजे जर्मनी व आलेमान्य ही नावे परकी लोकांनी दिलेली आहेत. प्राचीन ग्रीक लोक ज्यांना Egyptian म्हणतात व प्राचीन Seutic लोक ज्यांना मिस्त्र, मिसर म्हणतात ते लोक स्वतः आपल्या देशाला Kaumit म्हणत. तात्पर्य, परकी लोक एखाद्या देशाला त्या देशातील अगदी पहिल्यांदा भेटलेल्या जातींच्या क्विा प्रांताच्या नावावरून ओळखतात, हे उघड आहे. तोच प्रकार आपल्या भारत वर्षातील आर्यासंबंधाने ग्रीक फारसी व तदनुकरणाने अर्वाचीन युरोपियन लोक करतात. हे लोक आपल्याला इंडियन हिंदु म्हणतात व आपल्या देशाला इंदिअ हिंद म्हणतात." (समग्र राजवाडे साहित्य, खंड ७ पृ. ९९).

जर्मनी, ईजिप्त आदि देशांना परकीयांनी दिलेली नावे त्या देशांचे लोक स्वतः आपल्यासाठी वापरीत नाहीत असे स्वतः राजवाडे म्हणतात, आणि तरीही पुरातनकाळापासून भारतीय लोक आसेतुहिमाचल धारण करत आलेले 'हिन्दू' नांव त्यांना परकीयांनी दिलेले आहे असे प्रतिपादन करतात, हा भारतीयांना स्वाभिमानशून्यतेचा कलंक लावणारा केवढा विरोधाभास आहे!

बलराज मधोक देखील भारतीयांचे 'हिंदू'नाव इस्लामपूर्व ईराण्यांनी दिलेले आहे. असे म्हणतात ('हिंदू राज्य', भानुशालीकृत मराठी अनुवाद पृ. १०-११) --

"... आर्यांचा प्राचीन ग्रंथ व महान भारतीय संस्कृतीच्या ज्ञानाचा स्रोत असलेल्या ऋग्वेदात, या प्रदेशाला 'सप्तसिंधवः' असे म्हणजेच 'सात नद्यांचे क्षेत्र' असे संबोधले गेले आहे. याच प्रदेशात ब्रह्माने सृष्टिरचना केली असे मानले जाते व म्हणूनच या प्रदेशाला 'ब्रह्मावर्तही' संबोधले जाते. ईराणी लोक 'स' चा उच्चार 'ह' असा करतात. त्यांनी प्रथमपासूनच 'सप्तसिंधवः'च्या ऐवजी 'हप्तहिंदवः' असा उच्चार केला आहे. पारश्यांचा धर्मग्रंथ 'झेंद अवेस्ता'मध्ये 'हप्तहिंदवः' असाच उल्लेख स्पष्टपणे केलेला आढळतो. यावरून हे तर निश्चितपणे सिद्ध होते की इस्लाम व ईसाई

धर्माच्या स्थापनेपूर्वीच या प्रदेशाला सिंधुस्थान ही संज्ञा प्राप्त झाली होती. या प्रदेशातील लोक हे हिंदू या नावानेच ओळखले जात होते.'

श्री. दा. सातवळेकर म्हणतात की, 'हिंदू' नाव खरोखर परकीयांनी दिले असते, तर भारताच्या स्वाभिमानी जनतेने ते स्वतःला लावून घेतले नसते. 'वैदिक धर्म' मासिकाच्या १९२९ च्या अंकात 'अहिंदु की शुद्धि' या (हिंदी) लेखात ते म्हणतात--

"...कई लोग यही समझते हैं कि विदेशी लोगोंने यह नाम हिंदुओं को दिया। सिंधु शब्द का उच्चार विदेशी लोक न कर सके। वे सिंधु नदी को हिन्दु कहते थे, इसीसे उन्होंने आर्य जाति को यह नाम दिया और आर्यों ने उसको स्वीकार किया। यह कल्पनाही अवास्तविक है। हिन्दु लोक अत्यंत पुराणप्रिय हैं। ऐसे मनुष्य दूसरों का दिया हुवा नाम अपनेको और अपने धर्म को लगावेंगे और यह परकीय शब्द कोनेकोने तक के हिन्दु को सहजप्रिय हो जाय यह तो असंभव है। ...अतः वह शब्द अंतःप्रेरणा से ही उत्पन्न हुवा है। बाहरसे आया हुवा शब्द हिन्दुओं का इतना जीवश्च कण्ठश्च प्रिय कदापि नही हो सकता..."

मात्र, भारताच्या 'हिन्दु' नावाच्या तथाकथित ईराणी उगमाचे अशा प्रकारे उचित खंडन केल्यावर, पं. सातवळेकर 'मेरुतन्त्र' नामक संस्कृत रचनेतील 'हिंसया दूयते यस्मात् हिन्दुरित्यभिधीयते' ('हिंसेने ज्याला दुःख होते तो हिन्दु म्हटला जातो') या पंक्तीवर आधारित व्युत्पत्ति प्रतिपादन करतात. मला ती 'इन्दु' व्युत्पत्तीच्या तुलनेने कृत्रिम व मागाहून सुचविलेली दिसते.[1]

'हिन्दु' शब्द 'सिंधु' पासून झाला या कल्पनेच्या समर्थनार्थ काही

१) 'हिन्दू' शब्दाच्या अशा काही कल्पनारम्य व्युत्पत्ती :"हिमालयात् समारभ्य यावद् इन्दु सरोवरम् । तं देवनिर्मितं देशं हिन्दुस्थानं प्रचक्षते" (बार्हपत्यशास्त्र); " हीनं दूषयति इति हिन्दुः" (हीन कर्माचा त्याग करतो तो हिन्दु)- 'शब्द कल्प द्रुम';"हिनोति सर्वदूषाणि दुनोत्यन्यायपद्धतिम् । सर्वभूतरतो यस्तु सः हिन्दुः परिकीर्तितः" ('जो सर्व दुष्कर्मे त्यागतो, अनैतिक आचरणाचा विरोध करतो, सर्व प्राण्यांच्या सुखाची कामना करतो, त्याला हिन्दु म्हणतात.')



लेखक भारताचे प्राचीन नाव या स्वरूपात 'सिंधुस्थान' चा उल्लेख करतात (व त्याचे पुढे हिन्दुस्थान रूपांतर झाले असे सुचवितात). या संबंधात 'भविष्यपुराण'चा आधार दिला जातो. पण त्या पुराणात उघडच आधुनिक प्रक्षिप्त अंश असून, भारतावरील इंग्रजी सत्तेचाही उल्लेख आहे! (पाहा 'भारतीय संस्कृति कोश,' खण्ड ६ पृ. ४०५). त्याच्या उपलब्ध पाठाला श्री पार्गिटर,[1] श्री विंटरनिट्झ[2] व डॉ. मिराशी[3] अविश्वसनीय मानतात. आणि याशिवाय, देशाच्या एका कोपऱ्यांतील प्रदेशाचे नाव आसेतुहिमाचल संपूर्ण भारतवर्षात सर्वत्र धारण केले गेले ही कल्पना असंभव वाटते.

**कोणी कोणास प्रभावित केले?**

भारतीयांच्या 'हिंदु' नावाचा उगम इस्लामपूर्व ईराणमध्ये दाखविणारे प्रायः दोन विशेष शब्दांचा आधार देत असतात-- धर्मग्रंथ अवेस्ताचा 'हप्तहिंदू', आणि दारियसच्या शिलालेखांतील Hidus/Hindus. वस्तुतः या ईराणी शब्दांचा भारताशी संबंध नाही हे आपण वर पाहिले आहे. परंतु स्वतः ईराणात ते शब्द भारतासाठी प्रयुक्त होते असेही मानले, तरी ते 'हिंदु' नाव स्वतःसाठी स्वीकारण्याला भारतीय जनतेला प्रवृत्त (वा बाध्य) करण्याइतका प्राचीन ईराणचा भारतावर सांस्कृतिक प्रभाव (अथवा सैनिक दबाव) होता याचे काहीही प्रमाण नाही. किंबहुना याउलट (प्रकरण १ मध्ये दाखविल्याप्रमाणे) आपल्या पूर्वेकडील देशांवर प्राचीन भारताच्या सांस्कृतिक प्रभावाशिवाय, पश्चिमेसही भारताच्या संस्कृत भाषेने व साहित्याने ईराण,

1) 'The Purana Text of the Dynasties of the Kali Age,' Introduction, pp. Vii-viii.
2) 'History of Indian Literature', Eng Tran. Vol. I Part II, P 497.
3) Article in Journal of Indian History', Aug & Sept. 1974

अरबस्तान आदि देशांना प्रभावित केले होते.[१] हे स्पष्ट करीत एक इंग्रज लेखक म्हणतात [२]-- "Indian numerals, arithmetic, mathematics, philosophy and logic, mysticism,ethics, statecraft, military science, medicine, pharmacology, toxicologyc work on snakes Sarpavidya' -- and poison Visavidya), veterinary science, eroticism, astronomy, astrology, and palmistry were tramsitted. Chess and Chausar games were brought from India. We have a reference by an Arabic author from Andalusia to an Indian book on tunes and melodies. Indian fables and literary works are reflected in the Thousand And One Nights... To an appreciable extent, Sanskrit philosophy had already come to the attention of Sasanid Persians and its influence in the Islamic world was sometimes mediated by Sasanid schools. 'It was recognised among the Khusros (Akasira) of Persia that wisdom (hikma) originally came from Al-Hind' (Mas'udi, Muruj Adh-dhanab, I, P.160)". ['भारतीय संख्यांक, अंकगणित, गणितशास्त्र, दर्शनशास्त्र व तर्कशास्त्र, गूढत्वविद्या, नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, शस्त्रविज्ञान, औषधी, औषधी निर्माण विद्या, (सर्पविद्या व विषविद्या), पशुचिकित्साविद्या, कामशास्त्र, ग्रहज्योतिष, फलज्योतिषशास्त्र, हस्तरेखाशास्त्र प्राप्त केले गेले. बुद्धिबळ व चौसरचे खेळ भारतांतून आणले गेले. अंदल्शियाच्या एका अरबी लेखकाने सूर व रागांवरील एका भारतीय पुस्तकाचा केलेला उल्लेख उपलब्ध आहे. भारतीय कथा व

1) Max Muller लिहितात, "What do we owe to the Persians? It does not seem to be much, for they were not a very inventive race, and what they knew, they had chiefly learnt from their neighbours, the Babylonians and Assyrians". ('India--what can it teach us?,' Indian edition, p.17).
2) Andre Wink, "Al-Hind, the making of the Indo-Islamic world", Vol. I, Leiden, The Netherlands, (pp. 19-20).



साहित्यकृती 'एक हजार एक रात्री' या (अरबी) रचनेत प्रतिबिंबित आहेत... उल्लेखनीय स्तरावर संस्कृत दर्शनशास्त्र सेसानिड ईराण्यांच्या माहितीत पोचले होते; आणि इस्लामी जगात त्याचा प्रभाव कधीकधी सेसानिड पंथांच्या द्वारे पडला होता. ईराणच्या खुसरो (अकासिर) लोकांत हे मान्य होते की, ज्ञान ('हिक्म') मूलतः अल-हिंदपासून आले होते.']

या उद्धरणात ईराण, अरबस्तान आदि देशांना भारतापासून विविध विद्या आणि दर्शनशास्त्र आदि प्राप्त झाल्याचे म्हटले असून, ईराणच्या खुसरो लोकांचे कथन उद्धृत केले आहे की ज्ञान मूलतः अल्-हिंद (भारत) पासून आले होते. अशाच प्रकारे सुप्रसिद्ध अरबी साहित्य ग्रंथ 'Arabian Nights' ("usually known as One Thousand And One Nights") ची चर्चा करीत Encyclopedia Americana (Vol.2 p. 164) मध्ये म्हटले आहे,"Many of the stories are thought to be of Indian origin and to have undergone Persian transmission and remolding, both before and after the advent of the Islamic period in the 7th century A.D.". ['त्यांतील अनेक कथा मूलतः भारतीय आहेत असे मानले जाते; ईसवी सनाच्या सातव्या शतकांत झालेल्या इस्लामी कालखंडाच्या पूर्वी व नंतर त्या ईराणमध्ये पोचून त्यांची पुनर्रचना केली गेली'].

भारताचा शेजारी देशांवरील हा सारा सांस्कृतिक प्रभाव पाहता, या ज्ञानप्रवाहाबरोबरच भारताचे स्वतःचे नांवही त्या देशात सहजच पोचले नसेल काय? की, याऐवजी ते देश भारतासाठी एक नवे नांव तयार करून भारताला पोचविते आणि भारतीय ते स्वीकार करते? काय, त्यांच्यात आणि भारतात अशी एक वैचारिक देवाणघेवाण झाली होती, जिच्या अनुसार ईराणसारख्या देशांनी भारतापासून श्रेष्ठ ज्ञान प्राप्त करावयाचे, आणि त्याच्या बदल्यात भारतवर्षाने ईराणपासून स्वतःसाठी एक अतिरिक्त नाव 'हिंदु' आयात करावयाचे? संपूर्ण जागतिक सांस्कृतिक इतिहासात इतकी विचित्र कल्पना क्वचितच व्यक्त केली गेली असेल!

बरे, सैनिक दबावाबद्दल बोलायचे झाल्यास, पश्चिम भारताच्या काही (व तोही अनिश्चित) भागावर दारियसचा तथाकथित विजय देखील

अल्प समयच चालला.[1] आणि तेवढ्यात त्या प्रदेशावरही तो शाश्वत भाषिक प्रभाव पाडू शकला नसेल, मग शेष समग्र विशाल भारताची तर गोष्टच कशाला?

### विरोधी तर्काला अंतिम कलाटणी

इस्लामपूर्व ईराणी भारतावर एक अतिरिक्त नांव 'हिंदु' थोपू शकले नसते हे दाखवून दिले म्हणजे, भारतीयांना ते नाव विदेशियांनी दिले असे प्रतिपादन करणारे आपल्या तर्कटाला एका अंतिम कलाटणीचा सहारा देऊ चाहतात. त्यांच्या अनुसार इस्लामपूर्व ईराण्यांनी भारतासाठी (सिंधूपासून) 'हिंदू' नाव तयार केले पण ते आपल्या बोलण्यापुरतेच ठेवले, आणि नंतर भारतावर आक्रमण करणाऱ्या इस्लामधर्मी ईराणी, अरब, तुर्क आदींनी ते नाव संपूर्ण भारतीयांवर लादले. वर उद्धृत (शिवदत्तज्ञानी, सु. नदवी) अशा काही लेखकांशिवाय या भ्रामक प्रतिपादनाची आणखी उदाहरणे पाहा. Andre Wink (पू.उ.) प्राचीन ईराणवर भारताचाच सांस्कृतिक प्रभाव पडला होता हे मान्य करीत असूनही, लिहितात --

"In a political-geographical sense, India or Al-Hind, throughout the mediavel period was an Arab or Muslim conception. The Arabs, like the Greeks, adopted a pre-existing Persian term, but they were the first to extend its application to the entire Indianized region from Sind to Makran ..... It therefore appears to us as if the Indians or Hindus acquired a collective identity in interaction with Islam". (Introduction,p.5); "There is no Sanskrit term by which 'Indians' or 'Hindus' defined their collective identity or the

---

1) मजुमदारांच्या अनुसार दारियसचा भारतीय प्रदेश पंजाब अथवा सिंधमधे नसून सिंधूच्या दुसऱ्या बाजूस होता; आणि त्यावरही ईराणचा ताबा दारियसच्या मृत्यूनंतर चालू राहिला असे म्हणण्यास उचित प्रमाण नाही. पाहा, Article in "Indian Historical Quarterly", XXV, pp.163, 165; quoted in "The Cultural heritage of India", Ramkrishna Mission Publication, Calcutta, Vol. I.P.151)



country where they lived, except, in the latter case the concepts of Jambudvipa or Bharatvarsa which are cosmological rather than geographical. The Muslims, as we have seen, by referring to Indians as al-Hind adopted a pre-existing Persian term, not a Sanskrit term... The Persian usage of the term does not yet seem to have covered the entire sub-continent .... The Arabs thus widened the application of the Persian term". (पूर्वोक्त P.190). ['राजनैतिक भौगोलिक दृष्टीने पाहता, इंडिया अथवा अल्-हिंद एक अरबी अथवा इस्लामी धारणा होती. ग्रीकांप्रमाणे अरबांनी पूर्वीपासूनचा एक ईराणी शब्द घेतला, पण सर्वांत प्रथम त्यांनी त्याचा विस्तार सिंध पासून मकरान पावेतो इंडियन झालेल्या संपूर्ण प्रदेशासाठी केला... म्हणून आम्हाला असे वाटते की इंडियन अथवा हिंदू लोकांना इस्लामशी संबंध आल्याने एक सामुदायिक स्वरूप प्राप्त झाले ... इंडियन अथवा हिंदूंनी आपली सामुदायिक विशिष्ट ओळख, अथवा जेथे ते राहिले तो देश, संबोधित केला असा (केवळ देशासाठी जंबुद्वीप किंवा भारत अशा, आणि त्याही भौगोलिक पेक्षा वैश्विक आशयाच्या, धारणा सोडून) कोणताही संस्कृत शब्द नाही. आपण पाहिल्याप्रमाणे मुसलमानांनी इंडियनांना अल्-हिंद संबोधित करण्यात एक पूर्वीचा ईराणी शब्द वापरला, संस्कृत शब्द नव्हे... त्या शब्दाचा ईराणी प्रयोग तोपावेतो संपूर्ण उपखंडापावेतो प्रसृत झाला होता असे दिसत नाही..: अशा प्रकारे अरबांनी त्या ईराणी शब्दाचा वापर विस्तारला'.]

यात म्हटले आहे की, हिन्दुस्थान ही मुळांत अरबी अथवा मुसलमानी संकल्पना असून; मुसलमानांनी पूर्वीचा ईराणी शब्द 'हिंदू,' जो संस्कृत नव्हता, घेतला व त्याचा व्यापक रीत्या भारतासाठी प्रसार केला. अशाच भ्रामक कल्पनेने अमेरिकेतील एका शब्दकोशात म्हटले आहे.

"Hindustan literally means the 'land of the Hindus'. A

Persian and urdu word first used by Muslim invaders, Hindustan in the past signified northern India. It is now applied to India as a whole..." ('Academic American Encyclopedia'.) ['शब्दार्थाने हिंदुस्तान म्हणजे हिंदूंचा देश. मुसलमान आक्रमकांनी प्रथम वापरलेला हा ईराणी व उर्दू शब्द हिन्दुस्तान पूर्वी उत्तर भारतासाठी होता, आता तो संपूर्ण भारतासाठी वापरला जातो'.]

आणि अशाच प्रकारे एक भारतीय ऐतिहासिक शब्दकोशही म्हणतो-

"Hindustan--means the land of the Hindus. It is a term that is used to indicate nothern India from Peshwar to Assam and came into use after the conquest of northern India by the Muhammadans. Sometimes it is used in a wider sense to denote the whole of India".[१] ['हिन्दुस्तान म्हणजे हिंदूंचा देश. हा शब्द पेशावर ते आसाम पावेतोचा उत्तर इंडिया दर्शविण्यासाठी योजला जातो, व मुसलमानांनी उत्तर इंडिया काबीज केल्यानंतर प्रचारात आला. कधीकधी तो व्यापक रीत्या समग्र इंडियासाठी वापरला जातो.']

भारताला इस्लामपूर्व ईराण्यांनी 'हिंदू' नांव दिले या भ्रामक विधानाच्या खंडनाइतकेच, ते नांव भारतीयांवर इस्लामी आक्रमकांनी व्यापक थोपले या विधानाचेही खंडन आवश्यक आहे.

### अल-बेरूनीची निराधार कथनें

या संबंधात इस्लामी विद्वान अल-बेरूनीच्या Kitab fi Tahiqiq ma li'i-Hind ग्रंथावरही दृष्टिक्षेप इष्ट आहे. ते त्यांत भारताला 'हिंद' व भारतीयांना 'हिंदू' म्हणतात. अलबेरूनी सुलतान महंमद गझनवीचे समकालीन होते. महंमद गझनवीने उत्तर भारतावर अनेक आक्रमणे केली; परंतु अल-बेरूनीच्या अनुसार त्याच्या आक्रमणांचा वास्तविक उद्देश भारतीय

१) 'A Dictionary of Indian History', by S Bhattacharya (Geprge Brazilier New York).



प्रदेशावर कायम ताबा स्थापन करण्याचा नसून आपला खजीना अधिकाधिक संपन्न करणे हा होता.[१]

अल्बेरूनी हिंदूंना 'धार्मिक विरोधी' ("religious antagonists") म्हणतात. (उक्त, Vol.I P.7); आणि गर्वाने लिहितात-

"Mahmud utterly ruined the prosperity of the country, and performed there wonderful exploits, by which the Hindus became like atoms of dust scattered in all directions, and like a tale of old in the mouth of the people". ['महंमुदाने या देशाचे सारे वैभव नष्ट केले, आणि तेथे असे विस्मयजनक पराक्रम केले की, त्यामुळे हिन्दू सर्व दिशांनी फेकले गेलेल्या मातीच्या कणांसमान होऊन, लोकांच्या तोंडी एखाद्या भूतकालीन कथेप्रमाणे होऊन गेले.'][२]

अल्-बेरूनीचा हिन्दूविषयी हा दृष्टिकोण पाहता, जर 'हिन्दू' नावच मुळात मुसलमानी आक्रमकांनी भारतीयांवर थोपलेले असते, तर अलबेरूनी त्याचा उल्लेख अवश्य करते. परंतु त्यांच्या ग्रंथांत अशा आशयाचा काहीही संकेत नाही.

याशिवाय असे की, अलबेरूनींना हिन्दू फार अभिमानी व अहंकारी वाटले. ते म्हणतात-

"The Hindus believe that there is no country but theirs, no nation like theirs, no religion like theirs, no science like theirs" (P.22) ['हिन्दूंना विश्वास वाटतो की त्यांच्या देशासमान देश नाही, त्यांच्या राष्ट्रासमान राष्ट्र नाही, त्यांच्या धर्मासमान धर्म नाही, त्यांच्या विज्ञानासमान विज्ञान नाही][१]..."They are haughty, foolishly vain, self-conceited" (P.२२). "All their fanaticism is directed against all foreigners. They call them mleccha i.e.

१) "Al-beruni's India", by E.Sachau, Vol.I, Sachau's Preface, P.xvii.

२) उक्त, P.22.मात्र वस्तुतः 'हिंदू' धुळीत मिळाले नाहीत व स्मृतिशेष झाले नाहीत!

impure and forbid having any interconnection with them .... because thereby, they think, they would be poluted" (PP.19-20) ['ते क्रोधी, मूर्खतापूर्ण, अहंकारी, आत्मगर्विष्ठ आहेत.' 'त्यांची संपूर्ण धर्मांधता सर्व विदेशियांच्या विरूद्ध आहे; ते त्यांना म्लेच्छ म्हणजे अपवित्र म्हणतात; आणि त्यांच्याशी कोणताही परस्पर संपर्क अमान्य करतात.....कारण त्यामुळे ते विटाळतील असे त्यांना वाटते.']

अलबेरूनी जाणत होते की, हिंदूंचे इस्लामपूर्व ईराण्यांशी संबंध चांगले नव्हते, पण हिंदू मुसलमानाच्या विशेष विरुद्ध आहेत. ते लिहितात- (The Hindus had developed)

"aversion towards the countries of Khurasan. But then came Islam, the Persian empire perished, and the repugnance of the Hindus against foreigners increased more and more when the Muslims began to make their inroads into their country...All these events planted a deeply rooted hatred in their hearts". (P.2) "They differ from us to such a degree...as to declare our doings as the very opposite of all that is good and proper" (P.20) (हिंदूंच्या मनात) ['खुरासानच्या देशांविरुद्ध काहीसा विरोध होता. पण त्यानंतर इस्लाम आला, ईराणी साम्राज्य नष्ट झाले, आणि मुसलमान हिंदू देशावर आक्रमण करू लागले तेव्हा त्यांची विदेशियांविरूद्ध घृणा अधिकाधिक वाढत गेली... या सर्व घटनांनी त्यांच्या हृदयात खोल द्वेष रूजत गेला... ते आमच्यापासून इतके निराळे आहेत की.... ते आमचे आचरण नैतिकता व औचित्याच्या पूर्ण विरूद्ध मानतात).

स्वतः अल्बेरूनीने सांगितलेली भारतीयांची ही मनोवृत्ति लक्षात

१) आपल्या देशाच्या श्रेष्ठत्वाविषयी भारतीयांचा असा दृष्टिकोण (वर दर्शविल्याप्रमाणे) चीनी लेखकांनीही कथन केला आहे.



घेता, जर 'हिंदु' नाव मुसलमानांनी लादलेले म्हटले गेले असते तर अल्बेरूनी ज्या भारतीय विद्वानांना भेटले त्यांनी निश्चितच त्या संबोधनाचा विरोध केला असता, आणि अल्बेरूनीने त्याचा आपल्या ग्रंथात उल्लेख करून स्वतः 'हिंदू' आपल्याला कोणत्या प्रकारे संबोधित करतात हेही सांगितले असते. आणि हे आणखी आवश्यक यासाठी होते की, अवेस्ताच्या 'हप्तहिंदू'चा भारताशी वास्तविक संबंध नाही हे त्यांनीच विशेष रूपाने स्पष्ट केले आहे. परंतु भारतविषयक त्यांच्या तपशीलवार वर्णनांत त्यांना भारतात भेटलेल्या लोकांनी कधीही 'हिंदू' संबोधनावर आपत्ति घेतल्याचा उल्लेख वा संकेत नाही.

अल्बेरूनी ज्या ग्रंथाची चर्चा करतात त्यांत सांख्य, पातंजली व ज्योतिषग्रंथ असून, ते अनेकवेळा भगवद्गीता उद्धृत करतात. आणि त्यांतील काहींचे त्यांनी अरबी भाषांतर केले. ते 'भारतवर्ष' नांव जाणत होते. (Vol I P 249 आणि Chapter XXIX), व त्यांतील पांचाल, मगध, कलिंग, अवंती (उज्जैन), मदुरा आदि प्रदेशांचा ते निर्देश करतात (P. 298). आश्चर्यकारक तपशिलासह ते भारतीय पुराणे, पंचांग, तिथिगणना, दिन, मास व वर्ष, आदिचे विवेचन करतात; आणि महुरा (मथुरा), जौन (यमुना), गंगाद्वार (गंगेचा उगमस्त्रोत), मध्यभारतांतील धार व उज्जैन नगरे (pages २०२,२०३), दक्षिणेकडील 'मराठा देश' (P.203), आणि भारताच्या दक्षिण टोकावर स्थित 'रामेशर' (त्याच्या रामाशी संबंधासहित), यांचा उल्लेख करतात (PP.208-209). याशिवाय, ते काश्मीर, वाराणसी, मध्यदेश, मालव व सिंध मध्ये प्रचलित वर्णाक्षर लेखनाचीही माहिती देतात. (P.173)

भारताचे असे विस्तृत वर्णन 'हिंद'च्या 'हिंदू'शी निकट संबंध जोडण्याशिवाय संभव नव्हते. अल्बेरूनी स्वतः लिहितात की ते भारतीय विद्वानांना अनेक स्तरांवर भेटले. त्यांच्या एकंदर लेखनाचा उद्देशच हा होता की, आपल्या देशबांधवांना शेजारच्या विशाल भारत देशाचा भौगोलिक व सांस्कृतिक परिचय विस्तारपूर्वक करून द्यावा, आणि तो या देशांतील जनतेशी व साहित्याशी प्रत्यक्ष संपर्क स्थापित करून. अल्बेरूनी आपले

विस्तृत विवेचन या शब्दांत समाप्त करतात, "We think now that what we have related in this book will be sufficient for any one who wants to converse with the Hindus, and to discuss with them qustions of religion, science, or literature, on the very basis of their own civilization". (Vol.II. P.246) ['आम्हाला आता असे वाटते की, आम्ही या पुस्तकात जे सांगितले आहे, ते जो हिंदूंशी संवाद करू चाहतो, आणि त्यांच्या स्वतःच्या संस्कृतीच्या आधारावर त्यांच्याशी धर्म, विज्ञान अथवा साहित्य यांविषयी चर्चा करू चाहतो, अशा कोणासाठीही पर्याप्त होईल']. परंतु, त्यांचा हा उद्देश विफल झाला असता, आणि भारताच्या स्वाभिमानी विद्वानांनी, त्यांना 'हिंदू' संबोधणाऱ्या विदेशी व्यक्तीशी सार्थक सांस्कृतिक चर्चा केली नसती--- जर ते 'हिंदू' नाव भारतीयांवर त्याच विदेशी व्यक्तीच्या सहधर्मी इस्लामी (अथवा इस्लामपूर्व देखील) विदेशियांनी लादलेले आहे अशी अल्बेरूनींची धारणा असती.

स्पष्ट आहे की, भारतीयांचे 'हिंदू'नांव भारतातच तयार होऊन अलबेरूनीच्या समयापावेतो पूर्ण लोकप्रिय होऊन गेले होते. त्या नांवाच्या संबंधात जवाहरलाल नेहरू लिहितात,"The first reference to it in an Indian book is, I am told, in a tantric work of the eight century A.D., where Hindu means a people and not followers of a particular religion". (पू.उ. P 63) संभवतः नेहरू सातवळेकरांनी आधार घेतलेल्या (वर उद्धृत) 'मेरूतंत्र' चा उल्लेख करीत असावे. तो याचा स्पष्ट पुरावा आहे की, भारतात 'हिंदू' नाव मुसलमानी आक्रमणाच्या पूर्वीपासून रूढ होते (भलेही नेहरू 'मेरूतंत्र'चा संदर्भ देत असो वा अन्य किसी रचनेचा).

प्राचीन बिहारमधील सुप्रसिद्ध नालंद विद्यापीठ अनेक शतके ज्ञानाचे भांडार होते. ईसवी सातव्या शतकांत कनोजचा राजा हर्षवर्धन ने त्याला आश्रय दिला होता; आणि यु एन च्वांग तेथे बराच समय राहिले होते. त्यांनी तेथे, आपल्या लेखनात स्पष्ट उल्लेखिलेली भारताच्या नांवाची 'इंदु'पासून व्युत्पत्ति प्रतिपादन करणाऱ्या रचना पाहिल्या असल्या पाहिजेत. पण त्या विद्यापीठाचा विशाल ग्रंथसंग्रह मुसलमान आक्रमकांनी



जाळून भस्म केला, आणि शिवाय तेथील विद्वानांचा शिरच्छेद केला.[1] एक बौद्ध लेखक भारतावरील त्या इस्लामी आक्रमणाविषयी लिहितात,

> "The fanatic invaders destroyed not only their political and military enemies, but all people and institutions of other faiths. All the shrines, monasteries and schools were burnt and destroyed"[2]. ['धर्मांध आक्रमकांनी केवळ त्यांच्या राजनैतिक व सैनिक शत्रूंचाच नव्हे, तर अन्य धर्मांच्या सर्व लोकांचा व त्यांच्या संस्थांचाही विनाश करून टाकला. सर्व धर्मस्थळे, मठ व विद्यालये जाळून नष्ट करून टाकली.']

वस्तुस्थिती अशी आहे की, ('सिंधु'पासून उद्भूत) प्राचीन ईराणी शब्द 'हिंदू'चा अर्थ केवळ एक नदी (अथवा समुद्र) असा होता. आणि दुसरीकडे भारतात स्वतःसाठी 'इंदु'पासून एक अतिरिक्त संबोधन 'हिंदू' रूढ झाले होते. या दोन शब्दांत उच्चारसाम्यामुळे घोटाळा केला नसता, तर भारतीयांवर आक्रमक विदेशियांनी 'हिंदू' हे अतिरिक्त नाव थोपले अशी कल्पनाही कोणी गंभीरतेने केली नसती.

अल्-बेरूनीच्या पूर्वी सिंधप्रदेशावर इस्लामी अरबांचा पक्का ताबा नव्हता.

> "The Arabs in Sindh and the neighbouring Hindu princes of the Gurjara-Pratihara dynasty were at war with each other. Unlike them,the sourthern princes, the Ballahars (Vallabh-rajas) of the Rastrakuta dynasty (who in turn were fighting the northern Hindu princes) encouraged Arab merchants and travellers to settle in their territories".[1] ['सिंधमधील अरब आणि शेजारचे गुर्जर-प्रतिहारवंशी हिंदू राजे यांचे एकमेकाविरुद्ध युद्ध चालू असे. याउलट, दक्षिणेकडील

1) A.L. Basham, पूर्व उल्लेखित P. 268
2) "Thai Buddhism in the Buddhist World", by Phra Rajavaramuni (PP.44-45).

राष्ट्रकूटवंशी बल्लार (वल्लभ-राजे) (जे उत्तरेकडील हिंदू राजांशी लढत राहत) अरब व्यापाऱ्यांना व प्रवाशांना आपल्या प्रदेशात वसण्यासाठी प्रोत्साहन देत'].

अशा प्रकारे ज्यांनी 'सिंध'च्या एका भागात भारतीयांशी सशस्त्र संघर्ष केला, व दुसऱ्या भागात भारतीयांकडून मित्रतापूर्ण प्रवेश स्वीकारला, ते अरब लोक सिंधच्या भारतीय रहिवाशांवर एक नवे नांव कसे लादू शकले असते?

यानंतर उत्तर भारतावर आक्रमण करणाऱ्या मुसलमानांवर विचार करू. केवळ लूटमारीसाठी हल्ले करणाऱ्या महंमद गझनवीला तर अलगच ठेवा; महंमद घूरी (घोरी) देखील या देशावर कायम सत्ता स्थापन करू शकला नाही. मजुमदार म्हणतात की -- 'महंमद घूरीच्या विजयानंतर भारतात विभिन्न वंशांच्या अधीन मुसलमान साम्राज्य स्थापन झाले ही प्रचलित धारणा वस्तुस्थितीच्या विपरीत आहे; बहुतांश भारत ईसवी तेराव्या शतकाच्या जवळजवळ समाप्तीपावेतो मुसलमानी सत्तेपासून मुक्त राहिला'[१]. आणि पुढे चौदाव्या शतकानंतर भारतात सहा शक्तिसंपन्न राज्ये स्थापन झाली. तेव्हाही त्यांतील तीन - दक्षिणेत बहामनी राज्य, पश्चिमेत गुजरात व पूर्वेस बंगाल - मधे मुसलमानांची सत्ता स्थापन झाली, तरी त्यांचे प्रतिस्पर्धी व शेजारी -- दक्षिण भारतात विजयानगर, राजपुतान्यात मेवाड व पूर्वीय समुद्रतटावर ओरिसा-- यांवर हिंदूंची सत्ता होती. (पाहा तेच).

Andre Wink देखील (वर उद्धृत) "The Indians or Hindus acquired a collective identity in interaction with Islam" असे म्हणत असताही मान्य करतात की -

> "Hindu or Buddhist India was not conquered until the thirteeth century and parts of it remained outside the Muslim control until as late as the sixteeth century". (पूर्वउल्लेखित

१) "The Wonder that was India", Vol.II, by S.A.A. Rizvi, Introduction, P.xxvii.



P. 17) ['हिंदू अथवा बौद्ध भारत तेराव्या शतकापावेतो जिंकला गेला नव्हता, आणि त्याचे काही भाग सोळाव्या शतक्याइतक्या दीर्घ कालापावेतो मुसलमानी सत्तेच्या बाहेर राहिले.'] आणि यानंतर महाराष्ट्रात छत्रपती शिवाजीची हिंदू सत्ता उदयास येऊन कालांतराने तिच्या शाखा अनेक ठिकाणी पसरल्या.

अशा प्रकारे या कालखंडातही मुसलमानी सत्तेला भारतीयांवर एक नवीन नाव थोपणे शक्य नव्हते. वस्तुतः स्वतः भारतीयांनी 'हिंदू' नाव पुरातन कालापासून अंगिकारलेले असून, मुसलमानी सत्ताधीशांनी भारतीयांना संबोधित करण्यासाठी त्याचाच वापर केला.

**भाषिक रूपांतरित शब्द**

'इंदु' शब्दाचे भारतीय प्राकृत बोलभाषेत 'हिंदू' रूपांतर सहजसुलभ होते. अशा परिवर्तनाची काही उदाहरणे पाहा. संस्कृत 'इच्छा' पासून प्राकृतांत 'हिंछा' व 'हीछा' असे शब्द झाले आहेत. 'उमंग' पासून 'हुमंगना' (जोराने पुढे सरकणे) व 'उल्लास' वरून 'हुलास' प्रचलित झाले आहे. संस्कृत 'ओष्ठ' पासून हिंदीत 'होट' शब्द आला आहे. 'एक','एकल' (एकटा) यांपासून राजस्थानी बोलीत 'हकला' व पंजाबीत 'हिकटा' शब्द झाले आहेत. संस्कृत 'ईर्षा' चा 'हिसिषा' (हिसिखा) असा अपभ्रंश हिंदी सन्तकवि तुलसीदासांनी वापरला ओह. 'ईर्षा' पासून 'हीस' झाल्याचेही आढळते.

**भारतीबाहेरचीही अशी काही रूपांतरे.**

ENCYCLOPAEDIA BRITANNICA :- 'Adria' (a town) = Hadria. "Adrian' (Roman Emperor, also catholic Pope) = Hadrian. 'Aleppo' (city in Syria) = Halep. 'Alleelula' = Hallelujah. 'Ormizd' = Hormizd. 'ormuz' = Hormuz.

'इंदु'च्या 'हिंदू' रूपांतराप्रमाणे त्याचे Indo (indica, India) रूपांतरही साहजिक असून, यांत प्रारंभिक 'ह' गाळला गेला असे म्हणण्याची

१) "History and Culture of the Indian People", Vol.VI, preface by R.C. Majumdar.

आवश्यकता उरत नाही. 'हिंदु' या ईराणी शब्दापासून ग्रीक आदींनी भारताचे नाव घेतले असते तर तेही आपल्या उच्चारांत तो H 'ह' कायम ठेवू शकले नसते काय? त्यांच्या भाषेत H ने प्रारम्भ होणारे शब्द आहेत; उदाहरणार्थ Hades (पाताळ लोक), Hadrianus (एक प्राचीन रोमन बादशाहा), Hercules (Heracles) (एक प्रसिद्ध ग्रीक पौराणिक व्यक्ति), Hebakruk (पुरातन बायबलमधील एक व्यक्ति), Hesperides (ग्रीक पौराणिक अप्सरा). पण तरीही असा तर्क केला जातो [१] की, ग्रीक लोकात 'आयोनियन' जातीच्या बोलभाषेत 'ह' उच्चार नसून, त्यांनी ईराणी 'हिंदू' शब्दाचे Indos रूपांतर केले. परंतु ग्रीकांचा भारताशी सर्वप्रथम परिचय 'आयोनियन' जातीद्वारे झाला हे निश्चित आहे काय?[२] आणि ग्रीकांचे भारताशी प्राचीन काळापासून व्यापारी व सांस्कृतिक संबंध असताही, ग्रीक लोकांना भारताचे नाव स्वतः भारतीयांपासून प्राप्त न होता ईराण्यांपासून परिचित झाले हे तरी निश्चित आहे काय? ईसवी सन पूर्व पाचव्या व सहाव्या शतकांतील भारतीय दार्शनिक चिंतन ग्रीस पावेतो पोचले असल्याचे विवेचन करताना एक विद्वान म्हणतात, ('The Message of Plato' by Edward Urwick) -

> "I certainly do assume a fairly direct concept between India and Greece, just as I assume that the influence was profoundly fely by Plato" (Preface, p. viii); "Every one of the doctrines which we know formed the 'gospel' of Pythagorus and of the Pythagorian brotherhood of Crotona, was an almost exact reproduction of the cardinal doctrines of the Indian Vidyaa and the Indian Yoga" (PP. 13-14). ['भारत व ग्रीस यांत चांगला प्रत्यक्ष संबंध होता अशी माझी निश्चित धारणा असून, मी हेही मानतो की, प्लेटोवर त्याचा प्रभाव पडला होता...

---

१) पाहा H.G. Rawlinson, पू.उ. P.20.

२) अथवा, आयोनियन जातीचा असा उल्लेख Indo शब्द ईराणी Hidus/Hindus वरून झाला या पूर्वग्रहयुक्त कल्पनेची पुष्टि करण्यासाठी केवळ एक पश्चात्-तर्क तर नव्हे?



पायथॅगोरस व कोरोनच्या पायथॅगोरियन संघाच्या आम्हाला ज्ञात प्रतिपादनातील प्रत्येक सिद्धांत भारतीय विद्या व योगशास्त्राच्या प्रमुख सिद्धांतांचे जवळ जवळ हुबेहूब पुनर्कथन होते.'] एक अन्य विद्वान ही म्हणतात, "The Greeks long before the annexation of the Panjab by Persia, appear to have heard, in a dim sort of way, of India". (H.G. Rawlinson, PP. 18-19) ['ईराण्यांनी पंजाबवर ताबा करण्याच्या फार पूर्वीपासून ग्रीकांनी इंडियाविषयी काहीसे अस्पष्ट ऐकले होते असे दिसते').

प्राचीन ग्रीक भारताला Indos म्हणत. तो शब्द भारतीयांनी आपल्या देशासाठी प्रयुक्त 'इंदु' या नावांचा ग्रीक उच्चार समजला गेला असावा. अशाच प्रकारे ग्रीकांनी भारतीयांचे 'यमुना' (Jobannes), 'सिंधू' (Sindus), 'हिरण्यबाहु' (Errannoboas), 'प्राच्य' (Prasii/Praisioi) 'चन्द्रगुप्त' (Sandrokottos) आदि शब्द ग्रहण केले.

ग्रीक लोक या देशाला Indos म्हणत असत, तरी त्यांच्यातील काही जाणत होते की, त्याच्या पश्चिमेकडील विशाल नदीचे नाव Sindus (Sinthus) आहे; आणि त्यांना या दोन नावांतील फरक पाहून काहीसे आश्चर्यही वाटे.[1] असे दिसते की, कालांतराने Sindus चा उच्चारही (Indos ला अनुसरून) Indus होऊ लागला. परंतु Indos ची 'इंदु' पासून, आणि Indus ची Sindus पासून व्युत्पत्ति माहीत नसणाऱ्या काही ग्रीक लेखकांना वाटले की; भारताचे Indos नाव Indus नदीवरून झाले असावे. या दृष्टीने Diodorus Siculus (ईसवी पूर्व प्रथम शतक) लिहितात, ".... the river Indus from which the country takes its name" (R.C. Majumdar,"Classical Accounts of India", P. 239); आणि Arrian (ईसवी द्वितीयशतक) देखील म्हणतात, "...The rivers of India are certainly the largest to be found in all Asia. The mightiest are the Ganges and the Indus, from which the country receives the name". (तेच P. 216). पण वस्तुतः ही धारणा चुकीची आहे.

**समारोप**

भारताच्या 'हिन्दुस्थान' नावांतील 'हिंदु' शब्दाशिवाय 'स्थान' देखील

एक संस्कृत शब्द आहे. प्राचीन भारतात कनोजच्या उत्तरेस स्थानेश्वर नावांचे एक प्रसिद्ध शहरही होते.[2] अलबेरूनी संस्कृत विद्वान उत्पल यांना उद्धृत करून म्हणतात की, 'मुलतान'चे पुरातन नाव 'मूलस्थान' होते.[3] पण तरीही काही लेखक 'हिन्दुस्थान' शब्द 'हिन्दुस्तान' असा लिहून प्रतिपादन करतात की, त्या शब्दाचा उत्तरार्धही (अफगाणिस्तान, पाकिस्तान, आदिसमान) ईराणी (अथवा उर्दू) 'स्ताँ' आहे.

अवेस्ता भाषेत 'हिंदु' शब्दाच्या वर उद्धृत अर्थाशिवाय आधुनिक ईराणी भाषेत त्याचे काही अर्थ असे आहेत, 'An Indian; black; servant; slave; an infidel;....' आणि 'Hindu-zada' चा अर्थ 'Of low or obscure birth' असा आहे. (Persian-English Dictionary, by Johnson and Richardson).

भारतीय धर्माचे मूळ नांव 'वैदिक' होते; आणि देशाला 'इंदु' (हिंदू) हे अतिरिक्त नांव रूढ झाले. परंतु कालौघात वेदांव्यतिरिक्त स्मृतिग्रंथ, पुराणे, रामायण, महाभारतादि महाकाव्ये आदि साहित्य निर्माण होऊन, वेदांमध्ये निर्दिष्ट देवांशिवाय अन्यही देवदेवतांची पूजाभक्ति प्रचारात आली. असे दिसते की, त्या परिस्थितीत बहुसंख्य जनतेच्या धर्मालाही (देशाचे) 'हिंदु' हे अतिरिक्त लोकप्रिय नांव प्राप्त झाले; मात्र समग्र भारतासाठीही ते चालू राहिले. या धर्माचे 'वैदिक' ऐवजी 'हिंदू' नाव प्रचलित झाल्याने विशेषतः वेदांचे प्रामाण्य नाकारणाऱ्या बौद्ध,जैन आदि धर्मांचा आरंभीचा विरोधभाव कमी करण्यासही मदत झाली.

भारताचे एक नांव म्हणून 'इन्दु' शब्दाच्या दृष्टीने उपलब्ध संस्कृत, पाली आदि साहित्याचे पुनरावलोकन आवश्यक आहे. अशाच प्रकारे ब्रह्मदेश (मायमार), सयाम (थाइलॅंड), कंबोज (कंबोडिया), तिबेट, नेपाळ

१) Rawlinson, p.२०

२) पाहा Sachau, Vol I, p.199; Watters, Vol I, chapter 10; Beal, Vol.I PP. 215-16

३) पाहा Sachau पू.उ. Vol I. P. 298



आदि शेजारच्या देशांतील प्राचीन साहित्याचेही विशेष अध्ययन या विषयावर अधिक प्रकाश पाडू शकेल. प्राचीन भारतीय साहित्य चीन, नेपाल, तिबेट आदि देशांत बऱ्याच प्रमाणात पोचले होते हे दिग्दर्शित करीत जवाहरलाल नेहरू लिहितात--

"During the political revolutions from the eleventh century A.D. onward, crowds of Buddhist monks, carrying bundles of manuscripts, went to Nepal or crossed the Himalayas into Tibet. A considerable part of old Indian literature thus, and previously, found its way to China and Tibet, and in recent years it has been discovered afresh there in the originals or,more frequently, in translations. Many Indian classics have been preserved in Chinese and Tibetan translations relating not only to Buddhism but also to Brahmanism, astronomy, mathematics, medicine, etc." (The Discovery of India', P. 191).

सध्या अशा साहित्याशी आमचा परिचय बहुधा पाश्चिमात्य विद्वानांनी केलेल्या भाषांतराद्वारे होतो. हे भाषांतरकार निःसंदेह त्यांच्या परिश्रमार्थ आभारास पात्र आहेत; पण ते जेथे मूळ रचनेत भारताचा कोणत्याही नावाने निर्देश येतो तेथे प्रायः India/Indica/Indi असे लिहून देतात, व त्यामुळे आपण येथे पाहिलेली विशिष्ट भाषिक व्युत्पत्ती स्पष्ट होत नाही. अशा साहित्याशी भारतीय विद्वानांचा प्रत्यक्ष परिचय फार इष्ट आहे.



# सूची

## (उल्लेखित लेखन आणि लेखक)

Nehru, Jaiwaharlal, -"Discovery of India," ५, ६१, ७८-७९, ८६.
"Letters from a Father to his Daughter," ६२.
Olmstead, A.T. "History of the Persian Empire," ३७, ४१, ४४
Oxford English Dictionary, ५, ६
Pargiter, F.E. "The Purana Text etc" ६६
Rajavarmuni, Phra, "Thai Buddhism in the Buddhist World", ७९
Rawlinson, H.G. 'Intercourse between India and the Western World", ६,४५, ४७, ५०, ८३, ८४
Rizvi. S.A.A. "The Wonder that was India", Vol.II. ८०
Savarkar, "The Essentials of Hindutva" - १,२,३,७,६२, ६३, ६४
Sharma, Baijanath, "Harsa and his Times", ५८
Sharma B.R., ३०
Siculus Diodorus, ८४
"Study of Indian History and Culture" Vol.I. २९
Sylvain Levi, ८
Takakusu J. ५९
Tavadia, J.C. "Indo-Iranian Studies ३०
Thieme, Paul, ३१, ३८
Urwick, Edward, "The Message of Plato", ८३
Ved, Mehta, "A Portrait of India". ५
Veronica Garbutt, 'Asia Magazine', ९
Wink, Andre, "Al-Hind the making of the Indo-Islamic world", ७०,७२,८१
Winternitz, (Eng. Trans, "History of Indian Literature") ६९
"World University Encyclopedia", ६
Yuan Chwang (Hsuan-Tsang), Account of his travels in India, १२
- Trans, by S. Beal, "Buddhist Records of the Western world" १२, १४, १५, २२, ६४
- Trans, by Julien, १२, १४, १६, १८
- Trans, by Watters, "On Yuan Chwang's Travels in India" १२, १३, १४, १८, २३, ५१, ५२, ५३, ८५
"Zend Avesta", २, ४, ५, २५, २६, २९, ४१, ६६
- Edited by Geldner ३२
- Edited by Westerguard - ३१
- Trans by Darmesteter , २८, २९, ३२, ३३, ३४, ३५, ३६, ६५
- Trans by M. Haug, २९, ३१, ३२
- Trans by ilya Gershevitch ३५
- Trans by Mills, ३७
- Trans by Spiegal, २८

